

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







२७७२

अंक १, २, ३, ४

संपादक — प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग

वर्ष १६वे अंक १ला (६५) जानेवारी १९४३
वर्ष १६वे अंक २रा (६६) एप्रिल १९४३
वर्ष १६वे अंक ३रा (६७) जुलै १९४३
वर्ष १६वे अंक ४था (६८) ऑक्टोबर १९४३

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १६ वें ]

## अनुक्रमणिका

[ अंक ४ था

(अंक ६८)



---

## सभासदांस सूचना

महाराष्ट्र विद्यापीठ समितीचा वृत्तान्त मुंबअी सरकारने नुकताच प्रसिद्ध केलेला आहे. वृत्तान्ताचें मूल्य पांच आणे आहे. त्याबावत कांहीं सूचना करावयाच्या असल्यास त्या परिषदेच्या सभासदांनी कार्यालयाकडे जरूर कराव्यात. परिषदेच्या कार्यकारी मंडळास मुंबअी सरकाराकडे कांहीं सूचना पाठविणें झाल्यास या सूचनांचा अपयोग होअील.

—चिटणीस










# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## तिच्यासाठी



(ओवी)

होता जीवलग मित्र,
गति दैवाची विचित्र !
झाला आमुचा अ-मित्र
तिच्यासाठी. १

रम्य सहजीवनांत
घालविले दिनरात;
आता धरिला एकान्त
तिच्यासाठी. २

काव्यशास्त्रविनोदांत
होता काळ सुखें जात;
प्रवेशली ती मनांत
एका दिनीं. ३

—आणि सोडिला विवेक,
झाले प्रमाद अनेक,
केले दूर अेकअेक
तिच्यासाठी. ४

बुद्धि तेजस्वी तरल,
वृत्ति मनाची सरल,
ओकूं लागली गरल
तिच्यासाठी. ५

नाही अैकिलें जनाचे,
नाही मानिलें मनाचें,
चित्त परोपरी नाचे
तिच्यासाठी. ६

नको झालों आम्ही आता,
पडे संकट भेटतां;
जीव अुल्हासे पाहातां
तिजलागीं. ७

आम्ही दूर राहूं, तरी
चिंतूं हितच अंतरीं;
राग नसे त्याच्यावरी
तिच्यासाठी. ८

लाभो चिर प्रेम तिचें,
काम पुरोत प्रीतीचे,
पाश तोडिले नीतीचे
जिच्यासाठी. ९



## पहिली भेट

आठवते ती पहिली भेट
ओठांवर क्षण कांहि तरळलें
हातहि जुळले नाही जुळले
आठवते ती पहिली भेट.

प्रवास-धूसर साधा वेष
डोळे भोळे गोंधळलेले
गोजिरवाणें मुख सुकलेलें
विस्कटलेले लाघवि केश.

आठवते ती पहिली भेट
धीट पाखरूं घरटें सोडुन
ऊब आपुली आलें घेउन
आठवते ती पहिली भेट.

पुरुषोत्तम शिवराम रेगे

## जीवन्मृताचें शिणतों जिणें मी!

हेमन्त येवो, विलसो वसन्त,
त्याला नसे मात्र उसन्त कांही–
पाठीवरी नित्य असे पखाल,
रेडा जळावीण परन्तु मेला ! १

बागेंत पुष्पें फुललीं अनन्त
वाऱ्यावरी गन्ध दिगन्त जाय–
रात्रन्दिनीं शिम्पुनि रक्तबिन्दु,
माळ्याचिया मात्र करांत कांटे ! २

रे ! तापतां भास्कर चण्ड, माथां–
छाया करी शीतल भोवतालीं,
साहूनिया नित्य असे उन्हाळे
अन्तीं तरू हाय ! वठून गेला ! ३

आजन्म गाऊन जगास दुःखी–
त्याने दिली अद्भुत शान्ति कांहीं–
–त्याची कहाणी पुसतां कशाला ?
चिन्ता जिवा जाळि सदा विखारी ! ४

गेहांत माझ्या घट अमृताचे,
हा अङ्गणीं कल्पतरू विशाल,
अन् दावणीला सुरभी परन्तु–
जीवन्मृताचें शिणतों जिणें मी ! ५

कृ. व. निकुम्ब, नाशिक

अनुक्रमणिका

# कै. राजारामशास्त्री भागवत ह्यांचें धर्मविषयक लिखाण

(लेखिका : कु. दुर्गा भागवत)

कै. राजारामशास्त्री भागवत ह्यांच्या भाषाविषयक कामगिरीबद्दलचें विवेचन 'पत्रिके'-च्या ६५ व्या अंकांत आलेंच आहे. शास्त्रीबोवांच्या साहित्यमंदिराचें तें सर्वांत छोटें दालन आहे. शास्त्रीबोवांची खरी बुद्धिमत्ता त्यांच्या संशोधनात्मक लिखाणांत दिसून येते. त्यांचें संशोधन मुख्यतः वेदांचा, विशेषतः ऋग्वेदाचा, अभ्यास व धर्म ह्यांवर आधारलेलें आहे. त्यांचें वेदांवरचें बहुतेक लेखन संशोधनाच्या स्वरूपाचें व धार्मिक कळवळ्याने झालेलें असलें तरी त्यांचें धर्मविषयक लेखन मात्र अधिक प्रचारकी थाटाचें आणि भावनात्मक आहे. 'विचारमाधुकरी'सारख्या विषयांत शास्त्रीबोवांनी संशोधनाला अनुकूल असा भावनांचा संयम राखला आहे; त्यांच्या 'पार्स व पार्सी धर्म', 'मोगल व मोगली धर्म' ह्या लेखांत हीच तटस्थ वृत्ति पुष्कळ अंशीं आढळते. पण शास्त्रीबोवांचा हे लेख लिहिण्यामागचा खरा हेतु 'केवळ जिज्ञासापूर्ति' हा नसून सामाजिक व धार्मिक सुधारणा हा होता. ह्या त्यांच्या वृत्तीमुळे त्यांचे निव्वळ धार्मिक लेख कोणते व संशोधनात्मक लेख कोणते ह्यांचें वर्गीकरण करणें सोपें काम नाही. अेवढें मात्र खास सांगतां येतें की शास्त्रीबोवा प्रत्यक्ष व्यवहारांत वेदांसंबंधी किंवा त्यासारख्या संशोधनात्मक लिखाणाला धार्मिक लिखाणापेक्षा गौण मानीत. अुदाहरणार्थ, मराठ्यांच्या धर्माविषयी शास्त्रीबोवांचा पेशा पूर्णपणें प्रचारकी किंवा वारकरी बाण्याचा होता. महाराष्ट्रांतील संतकवींचे पोवाडे मुक्तकंठाने गातांना शास्त्रीबोवा वेद व अुपनिषदें ह्यांची महती विसरून जात; व म्हणत की आमच्या संतकवींच्या काव्यांत काय नाही? वेद आहे, अुपनिषदें आहेत, झालेंच भारत, रामायण, भागवत – सारें कांही आहे. त्यांनी सांगितलेला धर्म कळला म्हणजे वेदांतला, अुपनिषदांतला धर्म आपोआपच कळला. वेदांचा अभ्यास करायचा, पण तो अशाकरता की आजच्या सर्व व्यवहारांना व्यवस्थित रूप आणण्यासाठी आणि पुराणांनी जीं देवाधर्मांचीं खुळें पसरविलीं तीं मोडण्यासाठी; अस्पृश्यता, जातिभेद आणि शिवाशिवीचे आचरट प्रकार थांबविण्यासाठी. वेदांच्या अभ्यासाचा सर्वांत मोठा फायदा हा की त्यांच्या आधाराने आपल्याला सनातन व शुद्ध अशी वर्णाश्रमांची पद्धत फिरून आचरतां येअील अशी शास्त्रीबोवांची भावना शेवटपर्यंत होती. त्याचप्रमाणे पार्सी व मोगली धर्मांची सूक्ष्म बुद्धीने छाननी करतांना सुद्धा ते धर्म मूळच्या वैदिक धर्माशीं कसे संलग्न आहेत तें शास्त्रीबोवांना सुचवायचें होतें. महाभारतांतल्या वेगवेगळ्या कथानकांचा अूहापोह करतांना सुद्धा मूळचा शुद्ध आणि सात्त्विक असा 'ब्राह्मणी धर्म' आणि तितकाच दांभिक असा 'भिक्षुकी किंवा मटी' धर्म ह्यांवर त्यांनी वेळेवेळीं कोरडे ओढले आहेत.

शास्त्रीबोवांच्या धार्मिक भूमिकेची व त्यांच्या बदललेल्या मतांची छाननी करणें हें फार बिकट काम आहे. त्यांच्या धर्मविषयक लेखांचें सार थोडक्यांत पुढीलप्रमाणे देतां येअीलः—

(१) श्रुति व स्मृति ह्यांत सांगितलेला धर्म हा खरा धर्म आहे. परंतु तो आज महाराष्ट्रांत त्याच स्वरूपांत रूढ नाही. महाराष्ट्रीयांच्या पूजाअर्चा 'पौराणिक' रूढीप्रमाणे चालत

अनुक्रमणिका

आल्या आहेत. आणि त्यांचें तत्त्वज्ञान व ओीश्वराबद्दलच्या भावना संतमंडळींनी घडविल्या-प्रमाणे आहेत. भक्ति हा महाराष्ट्राचा आत्मा आहे.

(२) मूर्तिपूजा गौण असली तरी शास्त्रविहित असून अुपयुक्त आहे. निदान भक्ति-मार्गांत 'पहिलें पाअूल' म्हणून तिचें महत्त्व निःसंशय फार आहे. ह्या बाबतींत शास्त्रीबोवांचा प्रार्थनासमाजाशीं व ख्रिस्ती मिशनऱ्यांशीं कडक विरोध होता. 'हिंदुधर्मविवेचकां'तील 'संतमंडळी' ह्या लेखमालेंत अेका ठिकाणीं शास्त्रीबोवा असें म्हणतात की "संतमंडळीचे जसे आज आमच्या देशावर व लोकांवर अुपकार झालेले आहेत तसे कोणत्याहि मंडळीचे कोणत्याहि देशावर किंवा लोकांवर झालेले नाहीत. हल्ली मऱ्हाठ्यांस अुपनिपदांची गरज नाही, शांकरभाष्याची गरज नाही व संस्कृत भाषेचीहि नाही; जें कांही संस्कृतांत अुपयोगाचें होतें, तें सर्व संतमंडळीनें-अुर्फ सन्मणिमालेने आमच्या प्रिय मऱ्हाठी भाषेंत सुधारणा करून प्रति-बिंबवून ठेवलें आहे. जसे महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचे ह्या कामीं आम्हां मऱ्हाठ्यांवर अुपकार झाले आहेत तसेच ब्राह्मणेतरांचे झाले आहेत. त्यामुळे जसे महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचे तसे ब्राह्मणेतर जातींचे आम्ही अुपकार मानावे, व ते मानीतहि आहों. आम्हां मऱ्हाठ्यांमध्ये जे ब्राह्मण आहेत ते तुकारामबावांचा जितका मान ठेवितात तितकाच ब्राह्मणेतर लोक ज्ञानेश्वरांचा ठेवितात. जी भेदबुद्धि आम्हां शेकडा नव्याणव मऱ्हाठ्यांमध्ये नाही तिचा अुगीच आमच्यावर आरोप करून किंवा तिचा आलंब करून जर ब्रह्मद्वेषाची शंका येण्याजोगी नामधारी ख्रिस्ती लोकांसारखीं कामें न कराल व त्यांच्या वर्तमानपत्रांतून किंवा मासिक पुस्तकांतून क्षणभंगुर पैशाचा लोभ करून आमच्यांतील फूट वाढविण्यासारखे लेख न लिहाल तर फार अुत्तम होअील. जर कोणासहि ख्रिस्ती धर्म खरोखरी देवदत्त वाटत असला तर त्याने खुशाल ख्रिस्ती व्हावें. आम्ही हिंदु त्याच्या आड कधीहि येणार नाहीं. पण बाबांनो, हिंदु म्हणवून केवळ दुरभि-मानाने हिंदु धर्माची टर करण्यासाठी म्हणून ख्रिस्ती पत्रांबरोबर संबंध ठेवणें योग्य नाही. जर मूर्तिपूजा ही अगदी पहिली पायरी असें तुम्हांस वाटत असलें तर ती तुम्ही करूं नका, व अधिकार असल्यास खुशाल अगदी वरच्या पायरीवर बसून अुंच ठिकाणची हवा खा. पण मूर्तिपूजा करणें हा देवप्राप्तीचा मार्ग नव्हे असें म्हणून मात्र महाराष्ट्रमंडळापुढे मोठ्याने शंख-ध्वनि करूं नका. मऱ्हाठ्यांचे पूर्वज— जसे ब्राह्मणांचे तसेच ब्राह्मणेतरांचे— मूर्तिपूजेची व भक्तीची सांगड घालून देवास मिळविते झाले. तेव्हा ज्या वेळीं आपल्या वंद्य व स्मरणीय पूर्वजांस ब्राह्मण व ब्राह्मणेतर मऱ्हाठे अगदी विसरतील त्या वेळीं मूर्तिपूजानिषेधकांचें फावेल. पण तो दुर्दिन येण्यास अजून अगणित वर्षें गेलीं पाहिजेत, व तो दुर्दिन येअू नये म्हणून मऱ्हाठे तरी भगीरथ प्रयत्न करण्यास सोडणार नाहीत. पुढे देवाची अिच्छा. पण 'प्रयत्नीं परमेश्वर' हें मऱ्हाठ्यांस नीट अवगत आहे. ... आमच्या संतमंडळीस देव मिळाला नाही असें म्हणण्याची कोणाचीहि छाती नाही. ज्या रस्त्याने जाअून आमच्या संतमंडळीस देव मिळाला त्या रस्त्याने गेल्यास तोच देव आम्हांस निःसंशय मिळेल. सारांश, आम्हां अस्सल मऱ्हाठ्यांस व आम्हांबरोबर दरोबस्त अस्सल हिंदूंस देव धुंडाळण्याची गरज नाही. ज्या कोणास अितरत्र देवास धुंडणें असेल त्याने खुशाल धुंडावें. पण तसलें मत अस्सल मराठ्यां-मध्ये किंवा हिंदूंमध्ये मुळें धरील असें कोणास वाटत असेल तर मात्र ती आम्ही चूक समजतों."

(३) वेदांत गंधर्व, किन्नर, नाग अित्यादिकांचे अुल्लेख वारंवार आले आहेत. शास्त्री-बोवांनी 'विचारमाधुरीं'त हे प्राणी स्वर्गीय नसून हिमालयाच्याच आसपास वसति करून

राहिलेलीं माणसेंच होतीं हें अुपपत्तीच्या आधाराने दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. तरी पण अतिमानुप किंवा 'दैवी सृष्टी'वर शास्त्रीबोवांचा विश्वास होता. ही सृष्टि मानवी सृष्टीपेक्षा अुच्च असून मानवी सृष्टीप्रमाणेच देवास शरण जाते अशी त्यांची भावना होती. शास्त्रीबोवा अीश्वरावर दृढ श्रद्धा ठेवणारे होते. त्यामुळेच अीश्वर व आत्मा ह्यांबद्दल सदैव साशंक असणाऱ्या बौद्ध व जैन धर्मांबद्दल त्यांना वैषम्य वाटे.

शास्त्रीबोवांनी धर्मग्रंथांचा हा जो सारासार अभ्यास केला तो केवळ स्वतःची ज्ञानाची भूक भागवण्याकरता नव्हे; तसेंच त्यांनी ह्या विषयांवर लेख लिहिले तेहि कांही मार्मिकपणाने किंवा अुपदेशकी आव आणून लिहिले नाहीत. रानडे, भांडारकर ह्यांप्रमाणे 'धर्मपर' व्याख्यानें अगर लेख शास्त्रीबोवांनी कधीच लिहिले नाहीत. त्यामुळे त्यांचे धर्मविषयक लेख 'लोकहितवादीं'प्रमाणेच तात्त्विक आणि विवेचक आहेत. 'संतांनी सांगितलें त्यापेक्षा आपण ईश्वराबद्दल काय निराळें किंवा अधिक चांगलें सांगणार' अशी शास्त्रीबोवांची मनोभूमिका असल्यामुळे त्यांनी जुनेच अुतारे अधिक खुलासेवार लोकांपुढे ठेवले. 'ज्ञानेश्वरी महासागरांतील बुड्या', 'भगवद्गीतेंतील बुड्या' अित्यादि लेख व अेकनाथ, तुकाराम अित्यादिकांचीं चरित्रें शास्त्रीबोवांची ही वृत्ति स्पष्ट करून दाखवतात. शास्त्रीबोवांची वृत्ति अशी शेवटपर्यंत राहण्याचें मुख्य कारण म्हणजे वेदांच्या, संतवाङ्मयाच्या आणि अितिहासाच्या आधाराने त्यांना आपल्या अस्सल परंपरेला न सोडतां महाराष्ट्रीय समाजाची विस्कटलेली घडी नीट बसवावयाची होती. महाराष्ट्रांतील जातींचे परस्परसंबंध, लग्नाचें खरें शुद्ध स्वरूप, विधवाविवाह अित्यादि अनेक सामाजिक प्रश्न जुन्या वाङ्मयाच्या आणि प्रचलित रूढि आणि बोलभापा ह्यांच्या साहाय्याने ते पडताळून पाहत होते.

धर्मासंबंधी शास्त्रीबोवांच्या लेखनांत मोठें मतान्तर दिसून येतें तें असें की 'हिंदुधर्मविवेचका'च्या अंकांत १८८५ सालीं त्यांना तात्त्विकदृष्ट्या हिंदु धर्मांत कांहीच वावगें दिसत नव्हतें अेवढेंच नव्हे तर हिंदु धर्मासारखा दुसरा अुदारमतवादी धर्म नाही हें त्यांनी त्यांचीं अंगें व अुपांगें पडताळून प्रतिपादिलें आहे. 'श्रुति, स्मृति, पुराणें व शिष्टाचार', 'अितिहास (रामायण व महाभारत)', 'चातुर्वर्ण्य', 'चातुराश्रम्य', 'अवतार', 'सांख्यशास्त्र', 'योगशास्त्र' आणि 'संध्या' अित्यादि लेखांत ह्याच वृत्तीचा सूर अुमटलेला आहे. या वेळेस शास्त्रीबोवा हिंदुधर्म व हिंदूंच्या चाली ह्यांच्याकडे भेदक दृष्टीने पाहत नव्हते. 'हिंदुधर्मविवेचका'चा अवतार त्या वेळीं महाराष्ट्रांत वाढत चाललेलें धर्मांतराचें खूळ मोडून काढण्याकरिता होता. 'कुटुंबमित्र' व 'ज्ञानोदया'ला तें जाहीर आव्हान होतें. 'शिमग्याचा सण' ह्या आपल्या लेखांत शास्त्रीबोवा स्पष्टपणें म्हणतात कीं पाद्री लोकांस खूप करण्याच्या भरीस पडूं नका. आमचा धर्म आणि आमचें नांव समूळ नाहींसें होअीपर्यंत त्यांस चैन पडावयाचें नाही. ते हसत राहणारच. ह्याकरिता तुम्ही आपल्या दृष्टीने आपला विचार करा. आपण परतंत्र झालों आहोंत म्हणून सर्वसंगपरित्याग करून नित्य अुदासीन होअून रडत बसण्यापासून कांही उपयोग नाही. हाल मे ख्याल, ख्याल मे खुशाल हीच वृत्ति धरली पाहिजे. तात्पर्य, चालू शिमग्यांतला अत्याचार आणि किंचित् दुराचार दिसतो तो वजा केला असतां बाळगोपाळांस व राजारंकांस सारख्या रीतीने रमविणारा दुसरा अुत्तम सणच नाहीं."

पुढे रानड्यांचें व शास्त्रीबोवांचें साहचर्य घडलें. आणि डेक्किन कॉलेजमध्ये अध्यापकाचें काम करीत असतां व्यासंगाला अधिक अवसर सांपडून शास्त्रीबोवांच्या धार्मिक मतांत पालट होअूं लागला. आता त्यांना पूर्वीचें चातुर्वर्ण्य आवडलें तरी अस्पृश्यता ओळ्यांना सलूं

अनुक्रमणिका

लागली. स्त्रियांस वेदाधिकार नाही हें शल्य खुपूं लागलें. त्यांचप्रमाणे स्त्रियांना पुनर्विवाहास धर्माने मोकळीक ठेवूं नये हें बरें वाटेना. ह्याच वृत्ति अखेर बळावत जाअून त्यांनी हिंदुधर्म हा अधर्म आहे असें न कचरतां लिहिलें व महाराष्ट्रधर्माचा पुरस्कार पूर्वीपेक्षाही दुप्पट जोराने केला. त्यांचा रोख सर्व हिंदूंत समतेच्या तत्त्वाप्रमाणे रोटीबेटीव्यवहार कां होअूं नये ह्यावर होता.

परंतु त्यांच्या ह्या मतान्तराचा आढावा घेतांना अेक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही की वर शास्त्रीबोवांच्या धार्मिक मतांचीं जीं तीन सूत्रें दिलीं आहेत तीं मात्र प्रारंभापासून अखेरपर्यंत अढळ होतीं, व त्यांच्याच अनुरोधाने शास्त्रीबोवांच्या अितर मतांची छाननी करणें सोपें झालें. 'शास्त्रीबोवांचें सामाजिक लिखाण' ह्या सदराखाली त्यांच्या प्रासंगिक व सुधारणावादी लेखांचा परामर्श घेण्याचें ठरवलें आहे. त्यांत शास्त्रीबोवांचीं कांही मतें कां व कशीं पालटलीं ह्याचें अधिक खुलासेवार वर्णन करण्यात येअील.

त्यांच्या मुख्य धर्मविषयक लेखांचें विवेचन थोडक्यांत पुढीलप्रमाणे करतां येअीलः—

**महाराष्ट्रधर्म**— शास्त्रीबोवांच्या लोकप्रिय झालेल्या धर्मविषयक लेखांत 'महाराष्ट्र धर्मा'ची गणना प्रामुख्याने होते. शास्त्रीबोवांचे धार्मिक लेख त्या वेळच्या परिस्थितीस अुद्देशून लिहिले असले तरी आजच्या बदलल्या काळींहि वाचकास विचारोन्मुख करण्याचें सामर्थ्य त्यांमध्ये आहे. अेकीकडे खिस्ती धर्म, अेकीकडे प्रार्थनासमाजाचा धर्म आणि अेकीकडे आर्यसमाजाचा धर्म, अशा तीन लाटांत शिक्षित महाराष्ट्रसमाज हेलकावे खात असतांना सशास्त्र हिंदुधर्म व त्याची महाराष्ट्रांत झालेली परिणति ह्याचें विवेचन शास्त्रीबोवांनी ह्या लेखांत केलें आहे. धर्मभावना ही सर्वांत श्रेष्ठ भावना अशी शास्त्रीबोवांची श्रद्धा असल्यामुळे अेक प्रकारच्या मार्मिक कळकळीने त्यांनी हा लेख लिहिला आहे. ह्या लेखाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागांत ब्राह्मणांच्या वैदिक व औपनिषदिक किंवा 'कर्मठ' व 'वेदांति' धर्माचें निरूपण करून बौद्ध व जैन धर्मांच्या प्रसारामुळे ह्या मूळच्या धर्माचा कसा लोप झाला हें दाखविलें आहे. कुमारिल व शंकराचार्यांनी ह्या दोन मार्गांचा जीर्णोद्धार आपापल्या परीने कसा केला तेंहि ह्या भागांत दाखविलें आहे. शंकराचार्यांच्या चळवळींतूनच भगवद्गीतेला अुर्फ भक्तिमार्गाला प्राधान्य मिळालें. रामानुजानेहि भक्तिमार्गाचा पुरस्कार केला. दुसऱ्या भागांत "भगवद्गीते'वर असलेल्या भगवती धर्माचें अुर्फ 'महाराष्ट्र धर्मा'चें विवेचन केलें आहे. ह्यांत अनुक्रमें मुकुंदराय, ज्ञानेश्वर, नामदेव, अेकनाथ; रामदास, तुकाराम इत्यादि संतांच्या कार्यांचें वर्णन करून अितर प्रांतांतील संतांच्या कामगिरीमधील फरक स्पष्ट दाखविला आहे. 'महाराष्ट्रधर्मा'चें शास्त्रीबोवांच्या मतें हेंच वैशिष्ट्य होतें की त्यांत ब्राह्मण-शूद्र हा भेद नव्हता. व दुसरें म्हणजे रामदास-शिवाजी ह्यांच्या कर्तबगारीमुळे आध्यात्मिकाची सांगड 'दर्यारी धर्मा'शीं पडली. यामुळे 'महाराष्ट्रधर्मा'स जसा जिवंतपणा आला तसा दुसऱ्या प्रांतांतल्या धर्मांना आला नाही.

**ब्राह्मणी धर्म व भटी धर्म**— शास्त्रीबोवांच्या वेळीं गाजलेला असा त्यांचा अेक लेख 'ब्राह्मणी धर्म व भटी धर्म' हा होय. 'हेमंतव्याख्यानमाले'त हा लेख पहिल्याने पुढे आला. ह्या व्याख्यानाचा मूळ अुद्देश शास्त्रविहित धर्म व भिक्षुकांनी रूढ केलेला धर्म ह्यांतील तफावत दाखवून ब्राह्मणी धर्माचें महत्त्व हल्लीच्या काळीं प्रत्यक्ष व्यवहाराने कसें पटवतां येअील तें दाखविण्याचा होता. ब्राह्मण हा शब्द शास्त्रीबोवांनी जातीचा द्योतक म्हणून वापरला नसून शास्त्रशुद्ध आचरण करून अीश्वरभक्ति करणाऱ्यास लावला आहे. चोखामेळयास ते ब्राह्मण म्हणतात.

ब्राह्मणी धर्माचे शास्त्रीबोवांनी दोन भाग पाडले आहेत. पहिला वैदिक, कर्मठ किंवा रूढ भाषेंत बोलायचें झाल्यास कर्मकांडाचा. ह्यांत वैदिक याग व पुढे मीमांसेचा समावेश होतो. बौद्ध व जैन धर्माच्या प्रसारामुळे यज्ञयाग बंद पडले व कर्मठ ब्राह्मणधर्म लुप्तप्राय झाला. पुढे त्याचें पुनरुज्जीवन शबरस्वामी व कुमारिलभट्ट यांनी केलें. ह्या दोघांनी ज्या सुधारणा केल्या त्यांचें थोडक्यांत विवेचन शास्त्रीबोवांनी केलें आहे. ह्या सर्वांत महत्त्वाची सुधारणा म्हणजे यज्ञाधिकार आहे आणि धर्मांत तिचें स्थान पुरुषाच्या बरोबरीचें आहे हा सिद्धान्त होय. ह्याच्याच आधाराने स्त्रीला अुपनयनाचा अधिकार पोंचूं शकतो असें शास्त्रीबोवांनी प्रतिपादन केलें आहे. ह्या कर्मठ ब्राह्मणी धर्माचें शास्त्रीबोवांनी जें सार काढलें आहे तें असें:—

(१) चातुर्वर्ण्य म्हणजे हल्लीचा क्षुद्र व संकुचित जातिभेद नव्हे. चातुर्वर्ण्य गुणांवर अवलंबून होतें. चातुर्वर्ण्यांत रोटी बेटीव्यवहारास आडकाठी नसे.

(२) अुपनयन ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तिन्ही वर्णांत होत असे. तिशीच्या आंत लग्न शास्त्रविहित नाही.

(३) यज्ञयागांत मांसाहार अवश्य असे. अुलट कांदा-लसुणासारख्या वनस्पति निषिद्ध असत. हल्लीचें भक्ष्याभक्ष्यप्रकरण शास्त्रसंमत नाही.

ब्राह्मणी धर्माच्या दुसऱ्या शाखेचें नांव वेदान्त किंवा अुपनिषदांचा धर्म. ह्या धर्माचा जीर्णोद्धार शंकराचार्यांनी केला. हा धर्म आत्मशुद्धि व विरक्ति ह्यांवर अधिष्ठित झालेला आहे. हा धर्म जातिभेदाच्या व लिंगभेदाच्या पलीकडचा असून थोड्यांसच साध्य आहे. ही विद्या ज्यांना साध्य आहे तेच फक्त ब्राह्मण. बाकीचे सारे कृपण किंवा ब्राह्मणेतर होत. ह्याप्रमाणे पुरातन ब्राह्मणी धर्माचें विवेचन करून हल्लीच्या बालविवाह, जातिभेद, भक्ष्याभक्ष्य अित्यादि खुळचट कल्पना ज्यांत रूढ झाल्या आहेत त्या धर्माला शास्त्रीबोवांनी भटी धर्म असें नांव दिलें आहे. धर्माचें विवेचन करतांना शास्त्रीबोवांना 'हिंदु धर्म' ह्या शब्दाचें वावडें आहे. ते पूर्वीच्या धर्माला ब्राह्मणी धर्म व हल्लीच्या धर्माला भटी धर्म किंवा 'नकली धर्म' म्हणतात.

**ब्राह्मण म्हणविणारांस सवाल**— ब्राह्मण म्हणविणारांस सवाल हें त्यांचें 'हेमंत-व्याख्यानमालें'तलेंच दुसरें अेक व्याख्यान अधिक प्रासंगिक असून वरील मतांचेंच प्रतिपादन करणारें आहे. पहिल्या व्याख्यानापेक्षा हें अधिक कडवट असून त्याने त्या काळीं समाजांत वादाच्या अनेक वावटळी अुठल्या.

**पार्स व पार्सी धर्म**— 'पार्स व पार्सी धर्म' आणि 'मोगल व मोगली धर्म' हीं 'हेमंतव्याख्यानमालें'तील दोन व्याख्यानें त्यांतील विषयाच्या नावीन्यामुळे म्हणा किंवा ते धर्म हिंदु लोकांना परके वाटत असल्यामुळे म्हणा किंवा त्यांत प्रचलित चालीरीतीविरुद्ध कोठेच टीका नसल्याने म्हणा त्या काळीं लोकप्रिय झालीं होतीं. 'पार्स व पार्सी धर्म' ह्या निबंधांत आधुनिक पारशांच्या पूर्वजांची अुत्पत्ति आणि धर्म यांविषयी चर्चा केली आहे. वेद आणि दृह्युस्चा शिलालेख ह्यांमधील विधानें आधारभूत म्हणून धरलेलीं असलीं तरी शब्दसाम्यामुळे झालेली व्युत्पत्ति आणि अनुमानें ह्यांवरच ह्या लेखाची अुभारणी झाली आहे. आणि म्हणून संशोधनाच्या दृष्टीने त्याला फार महत्त्व देतां येत नाही.

'पार्स' हा शब्द शास्त्रीबोवांनीच कल्पिलेला आहे. दृह्युसने दिलेला 'पर्सु' शब्द आणि वेदांतील 'पारशव' आणि 'पर्शु' शब्द ह्यांपासून शास्त्रीबोवांनी 'पार्स' असा शब्द निघण्यास हरकत नाही असें ठरविलें. अेवढेंच नव्हे तर 'पार्स', 'पृथु' (पार्थेनियन) व 'पल्हव' (पेहलवीपासून निघालेला शब्द) हे अेकाच गटांतील लोक असून मागून वेगळे झाले असें

दाखविलें आहे. द्रुह्युस हा पार्सीचा राजा. पार्सीचा धर्म मूर्तिभंजक होता. पार्स लोक नद्या, डोंगर, अग्नि अित्यादि देवतांची पूजा करीत; त्यांचीं दैवतें देवनिर्मित होतीं, मनुष्याने तयार केलेलीं नव्हतीं.

पल्हवांच्या पैगंबराचें नांव 'जरतोस्त' असून 'अर्देसर' देवतेचें माहात्म्य ह्या लोकांत फार होतें.

**मोगल व मोगली धर्म—** 'मोगल व मोगली धर्म' हा लेख वरील लेखाप्रमाणेच आहे. मोगलांचे दोन प्रकार होते. अेक अस्सल मोगल. हे मूर्तिपूजक होते. ह्यांच्या धर्मावर मुख्य पगडा श्रमण संस्कृतीचा होता. श्रमण व ब्राह्मण ह्यांचे आचार परस्परविरोधी असले तरी व्रतवैकल्यें करून अिष्ट देवतेची कृपा संपादन करणारे दोघेहि होते. त्यामुळे वेगवेगळ्या लोकांत दोघांनाहि वर्चस्व मिळालें. श्रमणी धर्म तार्तरींत सर्वत्र पसरला होता. हाच मोगलांचा मूळचा देश. ह्याशिवाय 'लामा' किंवा बौद्धधर्माचा देखील थोडासा परिणाम मोगलांवर झाला होता. हे मोगल सहिष्णु असून 'चेंगिझ' हा त्यांच्यामध्ये सर्वांत मोठा पुरुष होऊन गेला. सर्व धर्म सारखे आहेत ही शिकवण त्याने प्रथम अंमलांत आणली. मोगलांच्या देवता बुरणुसाच्या व रेशमाच्या असत. आणि त्यांना नैवेद्य दाखविल्याशिवाय मोगल अन्न घेत नसत. दुसरे मोगल हे वरील मोगलांपासून विभक्त झालेले म्हणजे अविंध होत. ह्या दोघांमध्ये धर्मासंबंधी वारंवार युद्धें होत. हे मूर्तिभंजक होते.

**अुपनिषदें—** शास्त्रीबोवांनी अकरा अुपनिषदें, अिंग्रजी व मराठी भाषान्तरें व चर्चात्मक प्रस्तावना यांसहित तयार करण्याचें ठरविलें होतें. परंतु 'अैतरेय' व 'श्वेताश्वतर' हीं दोनच त्यांना पुरीं करतां आलीं.

शास्त्रीबोवांचा अुपनिषदांचा अभ्यास श्रद्धेवर आधारलेला आहे. ज्ञानाचें पावित्र्य, आचरणांतील शुद्धता आणि अढळ भक्ति हे तीन गुण अंगीं बाणावयास पाहिजे असतील तर अुपनिषदांचें अध्ययन जरूर केलें पाहिजे अशी त्यांची भावना होती. पण हें अध्ययन पारंपारिक अंधश्रद्धेने न होतां जिज्ञासापूर्वक साधकबाधक विचाराने झालें पाहिजे असें त्यांना वाटे. अुपनिषदांच्या प्रस्तावनेंत शास्त्रीबोवांची भूमिका स्पष्ट दिसून येते.

**ऐतरेयोपनिषद्—** शास्त्रीबोवांनी ह्या अुपनिषदांतले मांडलेले महत्त्वाचे मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत : (१) ह्या अुपनिषदांतील सृष्ट्युत्पत्तीची कथा व बायबलमधील त्याच विषयावरील कथा ह्यांची तुलना. बायबलमधील अीश्वराची कल्पना अधिक कोती व संकुचित आहे. कारण अुपनिषदांत अीश्वराच्या 'मी करीन' ह्या संकल्पानुसार सर्व ब्रह्माण्ड अेकाच वेळीं अेकदम निर्माण झालें; तर बायबलप्रमाणे आकाश, अुजेड अित्यादि तत्त्वें वेगवेगळीं गरजेप्रमाणे अीश्वराने 'अुत्पन्न होवोत' म्हटल्यावर निर्माण झालीं. (२) अन्नावर प्राणन अवलंबून आहे, जीवन नाही. सोप्या भाषेंत सांगावयाचें झाल्यास अन्नावर देहाचेच व्यापार काय ते चालूं शकतात. जीवनांत आध्यात्मिक विकासाचा अंतर्भाव होतो. (३) मनुष्याची योग्यता जनावराहून जास्त असण्याचें कारण असें की 'जो जीवात्मा भौतिक सृष्टीवर अंमल चालविणारा आहे तो परमात्म्याचा अंश आहे. परमात्म्याचा जीवरूपी अंश आठ लोकपाळांच्या आठ अंशांनिशीं आंत वसत असल्यामुळे मानवी प्राण्याची योग्यता बाकीच्या प्राण्यांहून कितीतरी पटीने अधिक आहे. (४) प्रज्ञा ही मानवाला मिळालेली अमोल देणगी असून तिला 'जगाचें नेत्र' म्हटलें आहे. (५) ब्रह्मा, अिंद्र अित्यादि देवता दुय्यम दर्जाच्या असून अीश्वर सर्वांत श्रेष्ठ आहे.

**श्वेताश्वतर**— 'श्वेताश्वतरोपनिषद्' तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने 'अैतरेया'पेक्षा वरचें ठरतें. ह्या अुपनिषदाच्या प्रस्तावनेंत शास्त्रीबोवांनी मीमांसा व पुराणें ह्यांची तुलना केली आहे. मीमांसेंत विचारीपणा व समंजसपणा ह्यांची पराकाष्ठा झाली असून पुराणांत मात्र माकडकथा व असंबद्ध प्रलाप ह्यांवरच जास्त भर दिला जातो असें त्यांनी म्हटलें आहे. मागच्या अुपनिषदाप्रमाणेच ह्याहि प्रस्तावनेंत शास्त्रीबोवांनी खिस्ती धर्म, मुसल्मानी धर्म आणि 'श्वेताश्वतरा'-चा बाणा ह्यांबद्दल मार्मिक चर्चा केली आहे. तिचा सारांश असा : 'श्वेताश्वतरां'त प्रशान्तपणा ज्याच्या अंगीं असेल त्यालाच ही विद्या शिकावी असें म्हटलें आहे. मुसल्मान ह्या शब्दाचा अर्थ 'शांति असलेला' असा आहे व खिस्तास तर 'शांतीचा राजा' म्हणतात. तेव्हा मुसल्मानांप्रमाणे आणि खिस्त्यांप्रमाणें त्या त्या धर्माची पायरी 'श्वेताश्वतरा'च्या वरची आहे असा आक्षेप त्यांच्याकडून येण्याचा संभव आहे. शास्त्रीबोवा ह्या आक्षेपाचें खंडन करतांना असें म्हणतात की सुंता किंवा बाप्तिस्मा अशा कोरड्या संस्कारांपासून प्रशान्तपणा येअू शकतो असें म्हणणें निवळ खोटें आहे. शांतपणा हा जात्याच माणसाच्या अंगीं असावा लागतो. शांति ही परमेश्वरी देणगी आहे. तिचा लाभ सर्वांच्याच नशिबीं नसतो. स्वाभाविक शांतपणा हा कांही व्यक्तींत अुघड, तर कांहींत सुप्तावस्थेंत असतो. प्रयत्नानीं ज्याचा शांतपणा जागृत होअून टिकाअू होअून राहण्याचा संभव असेल त्यालाच 'श्वेताश्वतरी' अमोल विद्या ग्रहण करतां येअील.

'श्वेताश्वतरा'च्या तत्त्वज्ञानांत मुख्यत्वें पुढील मुद्यांचा समावेश होतो. (१) अंतर्यामी आत्मा हा जीवाचा सोबती आहे. तो सर्व जाणतो, सर्व पाहतो. (२) जे देवास ओळखण्याचा यत्न करीत नाहीत ते दुःखांत बुडतात.

पुढील लेखांत त्यांच्या संशोधनात्मक लिखाणाचा परिचय देण्यांत करून येअील.

---

## गेल्या सतरा वर्षांतील शारदोपासना*

### रा. श्री. जोग

सतरा वर्षांपूर्वी जेव्हा आपण जमलों तेव्हा आपली भाषा मरणोन्मुख आहे, आणि आहे ही परिस्थिति कायम राहिल्यास आणखी पांचपंचवीस वर्षांत ती नष्ट होअील, असें आपणांस सांगण्यांत आलें. या वर्तमान स्थितीच्या विधानानें, आणि भविष्यकाळाविषयीच्या वाणीने, आम्हां शारदोपासकांस चांगलाच धक्का बसला व आम्ही स्तिमित झालों. त्या वेळचे अध्यक्ष कै. राजवाडे यांची विचारसरणीहि अमान्य करवेना. दुसऱ्याच वर्षी डॉ. केतकर यांनी कांही थोडा धीर दिला व भाषा अेकाअेकीं मरत नाही असें आश्वासन दिलें, व नंतर अेका

* गेल्या शारदोपासकांच्या संमेलनाच्या वेळचें स्वागताध्यक्षीय भाषण.

तपाने श्री. वरेरकरांनी मराठी भाषा जगेल, पण आपण सांगतों तो उपाय केला पाहिजे, असें सांगितलें. मराठी भाषेच्या मृत्यूची गोष्ट आता कोणी काढत नाही. परंतु कै. राजवाडे यांनी तिच्या मरणोन्मुखतेचें निदान ज्या कारणांवरून केलें तीं कारणें, तेवढ्याच तीव्र स्वरूपांत, आजहि अस्तित्वांत आहेत, व जे उपाय त्यांनी करावयास सांगितले त्यांपैकी अेखादाहि आपल्या हातून झाला असें वाटत नाही. बहात्तर रोगांवर अेकच औषध खरोखर असल्या-प्रमाणे स्वराज्याखेरीज भाषा किंवा वाङ्मय यांची धडगत नाही असें राजवाडे यांनी सांगितलें. हा अुपाय करणें आपल्यास साधलें नाही हें बोलून दाखवावयास नको. तो सोडला, व अितर अुपायांकडे वळलों तरी त्या दृष्टीनेहि विशेष कांही आम्हांला साधलें असें म्हणतां येणार नाही. आमचा राजकीय व्यवहार अिंग्रजींतूनच चालतो. न्यायालयांतूनहि अिंग्रजीचाच आश्रय आपणांस करावा लागतो. आपलें सुशिक्षितांचें व्यापाराविषयक लेखन अिंग्रजींतून चालतें. आमची युनिव्हर्सिटी अद्यापि झाली नाही. आमचें अुच्च शिक्षण बहुतांशीं अिंग्रजींतून चालतें. दुय्यम शाळांतून अजूनहि सर्वांत महत्त्वाचा विषय अिंग्रजीच आहे. रेडिओमध्ये अिंग्रजी अगर हिंदुस्तानीच अैकावें लागतें. नांवाच्या पाट्या अिंग्रजी भाषेंतून व मराठी लिपींत लिहिल्या जातात. खाजगी पत्रव्यवहार अिंग्रजींतून होतो. कित्येक मराठीच्या प्राध्यापकांचीं खाजगी पत्रें मला अिंग्रजींतूनच येतात. विद्वत्तापूर्ण लेखन व संशोधन अिंग्रजींतूनच चाललें आहे. माझ्या अेका माजी विद्यार्थिनीने व तिच्या भावी पतीने स्वतःच्या नांवाने निमंत्रणपत्रिका पाठविली याबद्दल मला कांही वाटलें नाही, मात्र ती अिंग्रजींतून पाठविली याबद्दल खेद वाटला. अितरांच्याहि विवाहपत्रिका अनेक तऱ्हा येतात. मला जबर शंका आहे की आधुनिक तरुणांचीं प्रेमपत्रेंहि अिंग्रजीमध्ये लिहिलेलीं असतात.

याप्रमाणे सतरा वर्षांपूर्वीच्या मानाने मराठी भाषेची व्यवहारदृष्ट्या स्थिति सुधारली आहे असें वाटत नाही. ती अधिक बिघडली नसेल, परंतु सुधारली असें म्हणतां येणार नाही. उलट वर्तमानपत्री लेखनांत व त्यामुळे बहुजनसमाजाच्या वाचनांत येणारी भाषा अिंग्रजी वळणावर अधिकाधिक जाअूं लागली आहे. माहितगार वर्तुळें, अक्षराष्ट्रें, कलेचीं क्षितिजें, सत्रंध सत्य, अनुभूतींची व्यक्तता, बुद्धिशीलता, निबंधाच्या कोनशिला या शब्दप्रयोगांतील प्रत्येक कल्पनेचें मूळ वळण अिंग्रजी आहे. मराठी भाषेचा पेहराव झपाट्याने बदलत आहे. जुनें बालबोध वळणाचें नेसण जाअून गोल तर आलेंच, पण झगाहि येण्याचा संभव वाटतो. त्या वेषाचें कापड म्हणजे शब्द मात्र देशी आहेत. असें असूनहि मराठी साहित्य अधिकाधिक समृद्धि पावत आहे ही गोष्ट निराशावादी माणसासहि मान्य करावी लागेल. मराठी भाषा व साहित्य अितक्यांत मृत्यु पावत नाही हें निश्चित. भाषेच्या व्यवहाराचें क्षेत्र, आणि तिचें आयुष्य किंवा साहित्यसंपत्ति, यांचें कै. राजवाडे यांनी मांडिलेलें समीकरण असावें तितकें सुदैवाने बरोबर दिसत नाही. निदान तेवढें भयप्रद नाही. पण अेवढ्याने निर्धास्त होअून तिच्या प्रसारार्थ प्रयत्न करण्याचें सोडून देणें योग्य होणार नाही. कै. राजवाडे यांनी सुचविलेली दुसरी गोष्ट आपल्या लक्षांत जेवढी यावी तेवढी आली नाही. निकटच्या भविष्यकालांत सुदैवाने स्वराज्य प्राप्त झालेंच तर अिंग्रजी जाअून सर्व प्रकारच्या व्यवहारांत मराठीचीच स्थापना होअील अशी काळजी घेणें अगत्याचें आहे. नाहीतर अेकराष्ट्रीयत्वाच्या साधनासाठी देशी का होअीना पण दुसरीच भाषा राजदरबारीं, न्यायालयांत, व्यापारांत व अितर व्यवहारांत यावयाची आणि आजचीच स्थिति स्वभाषेची राहावयाची. पण यापेक्षाहि महत्त्वाचा विचार असा की आपल्यापैकी बहुसंख्य अशा सुशिक्षित समाजाने स्वभाषेच्या सेवेचें हें कार्य करण्याची जबाबदारी काय ती

अनुक्रमणिका

वाङ्मयसेवकांची व शारदोपासकांची, आपण त्यांपैकी नसल्याने ती आपल्यावर पडत नाही, अशी भावना ठेवतां कामा नये. गेल्या पिढींतील कांही घराण्यांत धर्मसाधनार्थ ज्याप्रमाणे घरांत देवांची पूजा करावयास भटजी ठेवण्यांत येअी व आपण कांही न केलें तरी चालेल अशी भावना असे तद्वत् भाषाविषयक कर्तव्य संभाळण्यास आपले शारदोपासक आहेतच, आपण कसेंहि लिहिलें, कसेंहि बोललों तरी चालेल, अशी अनेकांची वृत्ति दिसते. वकील, डॉक्टर, सरकारी नोकर, व्यापारी, पेढीवाले– फार काय, शिक्षणक्षेत्रांतील मराठी सोडून अितर विषयांचे अध्यापक यांना स्वभाषेसंबंधींचें आपलें कर्तव्य नीट अुमगत नाही असाच अनुभव येतो.

दुसऱ्याच संमेलनांत डॉ. केतकरांनी भाषा अेकाअेकीं मरत नाही असा धीर देअून तिच्या व तीमधील वाङ्मयाच्या प्रसारार्थ 'खपेल तें लिहावें' असें, अर्थशास्त्राकडे लक्ष देअून, तत्त्व प्रतिपादन केलें. त्यांच्या विवेचनाचा पुष्कळसा भर दैनंदिन वर्तमानपत्री लेखनावर होता. डॉ. केतकरांची भाषा आताच अुल्लेखिलेल्या अिंग्रजी वळणाची असल्याने त्यांनी 'खपेल तें लिहावें' असा शब्दप्रयोग केला असला तरी त्याचा त्यांच्या मनांतील अर्थ बहुधा खपेल अशा पद्धतीने म्हणजे आकर्षक करून लिहावें असाच असावा. वाङ्मयसेवकांनी आपलीं मतें बाजूला ठेवून लोकांना आवडेल तेंच लिहावें असें नसून आपल्यास सांगावयाचें तेंच परंतु लोकांस आवडेल अशा पद्धतीने लिहावें असा त्यांचा अर्थ. या अर्थाने नव्हे परंतु निराळ्या अर्थाने खपेल तें लिहावें हा अुपदेश वर्तमानपत्रांनीच नव्हे, तर ललितवाङ्मयलेखकांनीहि चांगलाच आत्मसात् केला आहे हें सर्वांना माहीत आहेच. मला वाटतें, दुसऱ्या कोणत्याहि संमेलनाच्या अध्यक्षांचा अुपदेश शारदोपासकांनी अेवढ्या प्रमाणांत अमलांत आणला नसेल. अेवढेंच नव्हे तर त्या अुपदेशामध्ये भर घालून खपेल तें लिहावें अेवढेंच नव्हे, तर चालेल तें लिहावें आणि बोलावेंहि, असा आजच्या वाङ्मयसेवकांचा– निदान प्रथितयश साहित्यिकांचा– खाक्या दिसतो. डॉ. केतकरांच्या आत्म्यास आपल्या तत्त्वज्ञानाच्या या प्रसाराबद्दल काय वाटत असेल हें कळणें मात्र शक्य नाही. त्याच भाषणांत केतकरांनी राजवाड्यांच्या स्वराज्यसंपादनाच्या अुपायाला दुजोरा दिला होता त्याबाबत शारदोपासकांनी काय केलें तें मात्र सांगवत नाही. कदाचित् स्वराज्य मिळालेंच आहे असें केतकरांना पुढे वाटूं लागलें होतें तसेंच त्यांनाहि वाटत असेल. पुढील वर्षी कै. शिवरामपंत परांजपे यांनी शारदोपासकांस बहुजनसमाजाचीं सुखदुःखें रंगविण्याचा अुपदेश करून 'राष्ट्र नाही तर प्रियाहि नाही' असा भयसूचक अिशाराहि दिला. त्या अिशाऱ्याकडे वर वर तरी लक्ष अलीकडे वाङ्मयसेवक देअूं लागले आहेत. तथापि लोकांना मात्र असें वाटतें की बोलणें मात्र राष्ट्रभक्तीचें, व्यवहार– अर्थात् वाङ्मयीन व्यवहार– प्रियाराधनाचाच असतो. खरेंखोटें वाङ्मयसेवकच जाणोत.

यानंतर मध्ये सात वर्षे संमेलनावांचून सुनींच गेलीं. नंतर भरलेल्या पहिल्याच संमेलनांत श्री. वि. स. खांडेकर यांनी वाङ्मय व जीवन यांचे परस्परसंबंध जिव्हाळ्याचे झाले पाहिजेत, वाङ्मयांत व जीवनांत जी अेक भिंत अुभी आहे ती पाडली पाहिजे, मूर्तिभंजनाचा हक्क प्रत्येक पिढीला आहे, जुन्या रूढींचें भंजन टाळतां येणार नाही, पातिव्रत्यविडंबनाची हाकाटी व सोवळेपणा व्यर्थ आहेत, विनोदाचें संकुचित विदूषकी स्वरूप पालटलें पाहिजे अित्यादि अनेक गोष्टी सांगितल्या. यांतील अनेक गोष्टी शारदोपासकांनी अमलांत आणल्याहि आहेत: अगदी नको अितक्या प्रमाणांत अमलांत आणल्या आहेत. जीवन व वाङ्मय यांतील भिंत पाडून टाकण्यांत आली आहे अेवढेंच नव्हे, तर जीवनांतहि आवश्यक वाटणारा असा

आडपडदाहि फाडून टाकण्यांत आला आहे. विश्वामित्राप्रमाणे डोक्यावर आडवा हात धरणाऱ्या समाजाला त्याच्या अपकृत्यांचा परिपाक पाहावयास लावूंच लावूं असा चंग त्यांनी बांधलेला दिसतो व या अभिनिवेशाने वाङ्मयोपासक सर्व प्रकारची घाण प्रकाशांत आणून टाकूं लागले आहेत. तें पाहून आपल्या समाजांत कांही चांगलें आहे कीं नाही असा संभ्रम पडूं लागला आहे पावित्र्यविडंबन अितकें झालें आहे की विडंबन करावयास आता पावित्र्यच शिल्लक अुरलें नाही असें वाटतें. रूढिभंजन करणें हीच अेक रूढि होअून बसली आहे. खांडेकरांचा विनोदविषयक अुपदेश मात्र दुर्लक्षिला गेला, किंवा अेका अर्थानें पाडला गेला. त्यांत अितका मोकळेपणा, अितका वाह्यातपणा आला की ग्राम्यतेपासून त्याचें स्वरूप वेगळें करणें कठिण झालें. विदूषक विचारा फिक्का पडला व सोवळा ठरला.

पुढील वर्षी श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी वाङ्मयांत सत्यापेक्षा सत्याभास, आणि वास्तवतेपेक्षा आदर्शवत्ता, हींच येणें साहजिक आहे असें सांगून जीवन व वाङ्मय यांत या प्रकाराने फारकत असूनहि वाङ्मयवाचनामध्ये आनंद कां वाटतो त्याची मीमांसा करून आपली प्रत्यभिज्ञेची अुपपत्ति विस्ताराने मांडिली. मराठी भाषेच्या शुद्धीकरणासंबंधींचे आपले विचार चर्चेच्या प्रसंगाने प्रकट केले व भाषेंत आलेल्या परकीय शब्दांच्या सहेतुक अुच्चाटनाविरुद्ध आपलें मत दिलें. जुने शब्द भाषेमधून जाण्याचें कारण म्हणून त्यांनी असें सांगितलें की त्या शब्दांचा पृष्ठवंश म्हणजे अर्थदृष्ट्या असणारी त्यांची अुपयुक्तता नाहीशी होते. भाषेच्या स्वाभाविक विकासापुरतें त्यांचें म्हणणें सर्वस्वी खरें असलें तरी बाहेरून परकीय आक्रमणामुळे होणाऱ्या अनिष्ट परिणामांची वासलात त्यामुळे लागत नाही. आपल्या शब्दांची अुपयुक्तता कमी झालेली नसतांहि त्याच अर्थाचे परकीय शब्द रूढ होअून आपल्या शब्दांचें अुचाटन होतें याचा अर्थ शब्दांचा पृष्ठवंश ढिला पडतो असें नसून ते बोलणारांचा पृष्ठवंश कणखर नसतो हेंच होय. आम्हां मराठीभाषकांचा आणि वाङ्मयसेवकांचा पृष्ठवंश कणखर नसल्याने परकीय भाषांचीं आक्रमणें होत राहतात व स्वभाषेमधील अव्यवस्था अधिक वाढते. शुद्धलेखनाचें अराजक वर्षानुवर्षे चालतें आणि परिषदेने केलेले नवीन नियम रूढ होअूं शकत नाहीत याचा अर्थ काय ? परिषदेने नेमलेल्या ज्या समितीने हे नवीन नियम बनविले तिच्या सभासदांच्या स्वतःच्या लेखनांत किंवा परिषदेच्या अध्यक्षादि अधिकारी लोकांच्या लेखनांत ते नियम पाळले जात नाहीत याचा अर्थ काय ? त्या नियमांतच पृष्ठवंश नाही कीं ते नियम ज्यांच्याकरता केले व ज्यांनी केले त्यांच्यामध्ये पृष्ठवंश कणखर नाही ? तत्त्व बुद्धीला पटलें तरी व्यवहारांत आणण्यास आवश्यक असणारी भावनेची तीव्रता नाही हेंच याचें कारण होय.

यानंतरच्या समेलनांत ह. भ. प. ल. रा. पांगारकर यांनी संतवाङ्मय हेंच खरें पुरोगामी असून सध्याचें वाङ्मय तात्कालीन स्वरूपाचें व पांचपंचवीस वर्षांत नष्ट होणारें आहे, पुरोगामी नव्हे, असें बाहु अूर्ध्व करून सांगितलें. लक्षांत घेण्याची गोष्ट अशी की त्यांचें म्हणणें त्या वेळींहि कोणीं गंभीरपणें अैकून घेतलें नाही आणि आजहि कोणी शारदोपासक त्यावर विश्वास ठेवीत नाही. विश्वबंधुत्वाकडे अथवा विश्वैक्याकडे नेणारें हें वाङ्मय आजच्या शारदोपासकांना पटत नाही, पण साम्यवादाचा पुरस्कार करणारें तें वाङ्मय मात्र पुरोगामी, अतअेव स्वीकार्य व अुपासनायोग्य, असें त्यांस वाटतें हा प्रकार आपाततः तरी चमत्कारिक वाटण्याजोगा आहे. अेक अीश्वरादिविषयीच्या आस्तिक्यबुद्धीवर आधारलेलें आणि दुसरें त्याचा अिनकार करूनच निर्माण झालेलें अेवढ्याने हें झालें असावें काय ? दोन्ही वाङ्मयें मानवाच्या हिताहिताची जिव्हाळ्याने चर्चा करीत असतां पहिल्यांत मानवाच्या सुखदुःखाचें अखेरचें

कारण अथवा मूल आणि त्याचें साधन अथवा निराकरण अीश्वरेच्छेंत सामावलें आहे असें म्हटलें जातें व दुसऱ्यांत तें मानवांतच आहे असें मानलें जातें हा मुख्य महत्त्वाचा फरक त्यांमध्ये आहे. आस्तिक्यबुद्धीचा पारा आजच्या शारदोपासकांत जवळ जवळ शून्यांशापर्यंत अुतरला आहे. पांगारकरांसारखे ह. भ. पगवण या मूठभर सुशिक्षितांकडे दुर्लक्ष करून बहुसंख्य महाराष्ट्राचें हृदय अगदी निकोप आहे अशी ग्वाही देतात व आत्मतृप्त राहतात. परंतु अशानें भागणार नाही. वाङ्मयनिर्मिति अल्पसंख्य लोकच करतात व पूर्वी करीत होते. त्यांत शिक्षितांचाच भरणा फार असतो व पूर्वीहि होता. ते जें लोकांस सांगत राहतील त्याचा प्रसार आज ना अुद्या खालच्या अश वर्गांपर्यंत होअील. तेव्हा संतांचें वाङ्मय पुरोगामी राहावयाचें असेल तर तें नवशिक्षितांनाहि कसें पटेल हें पाहिलें पाहिजे. नाहीतर आपण पुरोगामी असलों तरी पाठीमागे पडलों आहोंत हें दृश्य पाहत स्वस्थ बसावें लागेल.

पुढील संमेलनांत नागपूरचे ना. के. बेहेरे यांनी भाषाशुद्धीच्या प्रयत्नांस प्रतिकूलता दर्शवून मराठी भाषेने आजवर जे फारशी, अरबी, कानडी, अिंग्रजी शब्द पचविले आहेत त्यांनी तिचें बल वाढलें असल्याचें सांगितलें. ती सोवळी करण्याचा किंवा तिचें पंडितीकरण करण्याचा प्रयत्न राष्ट्रीयत्वाला विघातक आहे असेंहि त्यांनी बजावलें. पंडितांच्या भाषेबरोबर साम्यवाद्यांच्या अिंग्रजीचें अनुकरण करणाऱ्या ढंगाच्या मराठीचाहि त्यांनी तीव्र निषेध केला. याबरोबरच महाराष्ट्राच्या अेकीकरणावर मराठी भाषेच्या हिताच्या दृष्टीने त्यांनी भर दिला. मध्यप्रांतांत हिंदीच्या आक्रमणाने दहा वर्षांत मराठी भाषा नष्ट होण्याची भीतीहि त्यांनी घातली. महाराष्ट्राचा अेक स्वतंत्र प्रांत झाल्याखेरीज मराठीवरील हिंदीचें आक्रमण कमी होणार नाही असें त्यांना वाटतें. कै. राजवाडे यांनी याबाबत सूचना देअून ठेवलीच होती. "केवळ महाराष्ट्राचें अेक राष्ट्र बनविण्याची स्वल्प परंतु सुलभ महत्त्वाकांक्षा तुम्हीं बाळगूं लागाल तेव्हाच तुमचें अेकच अेक लक्ष स्वभाषा जी मराठी तिजकडे जाअील" असें त्यांनी पहिल्या शा. सं. च्या वेळींच सांगून ठेवलें होतें. अखिल राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने आवश्यक असणारी गोष्ट स्वभाषेच्या हितास अप्रत्यक्षपणें का होअीना घातक ठरत असल्यास शारदोपासकांचें मन द्विधा व्हावें यांत आश्चर्य नाही. या दोहोंचाहि योग्य समन्वय लावणें अशक्य असूं नये. परंतु त्या दृष्टीने आज फारसा विचार कोणी करीत नाही. आज पुण्यासारख्या मराठीचें केंद्र समजलें जाणाऱ्या स्थानीं देखावा मात्र असा दिसतो की म. सा. प. च्या परीक्षांना बसणाऱ्यांची संख्या हिंदी परीक्षांना बसणाऱ्यांच्या मानाने फारच अल्प आहे. याचें श्रेय वा अपश्रेय राष्ट्रभाषेच्या प्रचारकांना किंवा म. सा. प. च्या कार्यकर्त्यांना कीं या परीक्षांस बसणाऱ्या महाराष्ट्रीय जनतेला आहे याचा विचार करण्याचें मी आपल्यावरच सोंपवितों.

बेहेरे ह्यांच्यानंतर वरेरकर यांनी मराठी भाषा जगेल, पण त्याकरिता वाङ्मयसेवकांच्या सुस्थितीकडे पाहावयास हवें, वास्तव वाङ्मयसेवकांनी संघटना करून स्वतःवर होणाऱ्या अन्यायांचा प्रतिकार करावयास व स्वतःच्या हक्कांचें संरक्षण करावयास हवें, असा अुपाय सांगितला. हें सांगणें ठीक झालें, परंतु तें व्यवहारांत अुतरण्याचीं फारशीं चिन्हें दिसत नाहीत. प्रथितयश साहित्यिकांचे आजचे संबंध पाहिले तर त्यांची संघटना होणें कठिणच वाटतें. साहित्यिकांची संघटना वदतो व्याघातातें अुदाहरण तर नाही अशी शंका येते. निरनिराळ्या शहरीं वाङ्मयमंडळें आहेत, परंतु त्यांस संघटना म्हणतां येअील असें वाटत नाही. अलीकडील कांही प्रकार पाहिल्यावर तर साहित्यिक हा प्राणी हिंस्र असावा, व तो जेवढा प्रथितयश तेवढा अधिक

दिग्न असावा, असें सामान्य जनांस वाटूं लागलें आहे. कळप किंवा समाज करून राहणें त्याला अशक्य दिसतें.

यानंतर नागपूरचे दुसरे वाङ्मयसेवक श्री. माडखोलकर यांनी प्रचलित मराठी वाङ्मयांतील अराजकाची मीमांसा केली. महान् नेता, महान् ध्येय व महान् कार्यक्रम नाही म्हणून वाङ्मयांत अराजक माजल्याचें निदान त्यांनी केलें; मात्र अेखादा कार्यक्रम सुचविला नाही. हें विधान ते महाराष्ट्रापुरतें करीत होते कीं सबंध भारतवर्षासंबंधी करीत होते हें स्पष्ट नाही. महान् नेता नसला तरी महान् ध्येयें नाहींत असें अलीकडील कोणत्याहि कालासंबंधीं म्हणतां येअील असें वाटत नाही. भारतवर्षांत पाहावें तर गेल्या पंचवीस वर्षांत महान् नेते, महान् ध्येयें व महान् कार्यक्रम यांपैकी कशाचीच अुणीव नाही. महाराष्ट्रीय शारदोपासकांना यांतील अेखादेंहि पटलें नाही असें म्हणावयाचें काय? मग असें कां व्हावें? बाहेरच्या गोष्टी महान् असल्या तरी साहित्यिक महान् व्हावयास आंतलें जातीचें कांही तरी लागत असावें. बाह्य महान् गोष्टी आणि महान् साहित्यिक यांचा असावा तेवढा घनिष्ठ कार्यकारणभाव नसावा. किंवा कांही असलें तरी दर दशकाला किंवा दर पंचवीस वर्षांना किंवा शतकालाहि ज्ञानेश्वर निघत नसतात तेव्हा आपण अुगाच दळहळूं नये असें समजावें काय? माडखोलकरांच्या नंतर ना. ह. आपटे यांनीहि मराठी वाङ्मयामधील अराजकाची परिस्थितिनिष्ठ मीमांसा केली. प्लेग, महायुद्ध व अितर अस्वास्थ्य यांचा परिपाक म्हणजेच आजचें वाङ्मयीन अराजक होय असें त्यांनी सांगितलें. यावर अुपाय म्हणून व चांगल्या तेजस्वी वाङ्मयाची निपज व्हावी अेतदर्थ साहित्यिकांनी रामदासांप्रमाणे जनस्वी व्हावें म्हणजे त्यांच्या वाङ्मयाप्रमाणेच आजचें वाङ्मयहि तेजस्वी व प्रभावी होअील अशी विचारसरणी गेल्या वर्षीचे अध्यक्ष श्री. पु. मं. लाड यांनी पुढे मांडिली. याबाबत साहित्यिकांची प्रतिक्रिया काय झाली हें ठरविण्यास पुरेसा काल गेला नाही. बहुधा गेल्या पंधरावीस वर्षांत अशा अुपदेशांचा जो परिणाम झाला तोच याचाहि झाला असावा. बहुतेक साहित्यिकांची वृत्ति केशवसुतांनी म्हटल्याप्रमाणे 'अशी असावी कविता, फिरून। अशी नसावी कविता म्हणून। सांगावया कोण तुम्ही अम्हांला।' अशीच असते. खऱ्या साहित्याचें स्वरूप अशा बाह्योपदेशांनी फार थोडें ठरतें असें वाटतें. अंतरींच्या खऱ्या प्रवृत्तीच शेवटीं प्रबळ ठरतात. त्या प्रवृत्तींचा प्रवाह बाह्योपचारांना न जुमानतांच आपला मार्ग क्रमीत असतो. गेल्या दहा अकरा संमेलनांची फलश्रुति ही अशी आहे.

---

# कांही व्युत्पत्ति

१

**गुंजी :– कुंजवन** यापासून आला असावा असें एक मत (मोडक).

शब्दारंभींच्या क् चा ग् होणें भाषाशास्त्रास विरुद्ध आहे. अशा क् चा विकल्पाने लोप होतो किंवा त्याला मृदुत्व प्राप्त होतें.

प्राकृत भाषांमध्ये क् चा लोप होण्यास तें व्यंजन शब्दारंभीं नसलें पाहिजे. स्वरात् परेषां अनादिभूतानां असंयुक्तानां कगचजतदपयवानां प्रायो लुग् भवति (सिद्धहेम ८, १, १७७ पाहा.). क् चा ग् व्हावयाचा झाल्यासहि तें अक्षर शब्दारंभीं नसलें पाहिजे हाच नियम आहे:– अनादौ स्वरादसंयुक्तानां कखतथपफां गघदधबभाः (सिद्धहेम, ८, ४, ३९६). कंदुकापासून गेंदुअ असें रूप होतें असें हेमचंद्राने आपल्या व्याकरणांत म्हटलें आहे हें खरें (८, १, ५७ ?) पण हा केवळ अेक अपवाद म्हणून त्याने नमूद केला आहे. जर्मन पंडित पिशेल यांनी गेंदुआचा कंदुकाशीं संबंध अमान्यच केला आहे. त्यांच्या मताने मागधी किंवा शौरसेनी गेंदुअ, व अर्धमागधी गिंडु या शब्दांचा संस्कृत कंदुकाशीं संबंध जोडतां येणें शक्यच नाही (kann nicht auf kanduka zuruckgefuhrt werden ) गेन्दु आचा अुगम गिद् किंवा गिड् या मूळांत असावा असें त्यांचें मत आहे. (Grammatik der Prakrit sprachen, Strassburg. 1900, § 107, pg. 93.). संस्कृत कोशांत गेन्दुक, गेन्डुक, गेन्डूक, गिन्दुक अशा स्वरूपांत हा शब्द सांपडतो. अमरकोशांतहि तो दिला आहे (गेन्दुकः कन्दुको. द्वि. काण्ड, मनुष्यवर्ग–पंक्ति १३५०). क्रीडा या अर्थी गेंडुअी हा शब्द हेमचंद्रहि आपल्या **देशी नाममालेंत** नमूद करतो. त्यावरून गेंदुआच्या संस्कृत व्युत्पत्तीविषयी तो साशंक दिसतो. शब्दारंभीं क् चा ग् न होतां अितर विकार होणें मात्र शक्य दिसतें. अुदा० कुब्जे खः (प्रा. प्रकाश २,३४) किंवा किराते चः (प्रा. प्रकाश २.३३). म्हणजे कुब्जपासून खुजा किंवा कन्दुक पासून चेंडू असे शब्द येतील.

**जुगार** :— द्यूतकार या संस्कृत शब्दापासून येणें शक्य आहे. पण द्यूत या अर्थाने मराठींत प्रचलित असलेला शब्द मात्र पोर्तुगीज भाषेंतून आला असावा असें वाटतें. जुगार शब्दाचा अर्थ द्यूतकार असा नसून द्यूत असा आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. संस्कृत द्यूत शब्दापासून मराठींत जूं किंवा जुवा, व द्यूतकार पासून जुवार-जुवारी हे शब्द जुन्या मराठींत रूढ आहेत. कालासि जुं खेळणें, राज० ज्ञाने.१५,४४८; तें जिणें कीं **जुवाराचें**, ज्ञाने. १८, ६७० हीं अुदाहरणें पाहावीं.

**कामगार** :— कर्मकारापासून कामगार झाला असें अेक मत (मोडक). वास्तविक कामगार यांतील ‘गार’ हा फारशी प्रत्यय आहे. अुदा० गुन्हेगार, खिदमतगार, शिकलगार, मदतगार. कामगार हा मराठींत अलीकडील शब्द आहे. संस्कृत कर्मकारापासून कामार असा शब्द होणें जास्त संभवनीय; जसें– चर्मकार (चांमार), कुंभकार (कुंमार), सुवर्णकार (सोनार).

**गार** :— करकापासून निघाला असें अेक मत (मोडक). शब्दारंभींचा क् चा ग् होणें कठिण हें वर पाहिलेंच. गार– ग्रावन्‌पासून निघणें शक्य आहे. ग्रावा प्र. अेकवचन. त्यापासून

गरावा–गाराव–गारा–गार. गार आणि ग्रावा यांमधील लिंगभेद ही अडचण होऊं नये. संस्कृतांतून मराठींत शब्द येतांना लिंगपालट होतो याचीं अुदाहरणें मध्याह्न, शपथ, हनु, राशि, अश्रि अित्यादि. मित्र, जन्म, वपु, वस्तु हे आणखी शब्द असे आहेत.

**बहुत** :— प्रभूत पासून आला असें अेक मत (मोडक). तो संस्कृत बहु शब्दापासून बहुत्व–बहुत्त–बहूत अशा प्रकाराने आला असावा. तैत्तिरीयसंहितेंत 'बहुतय' असा शब्द आहे (तेभ्य अेव ददत्युत यद्बहुतया भवन्ति ६,१,६,६).

**विंडा** :— पिंड शब्दापासून असें मोडक यांचें मत. 'बिंड' शब्दाचा कोशांत अर्थ पुढील-प्रमाणे आहे. A roll or band of grass and leaves along with the corner of a thatch– मोल्सवर्थ. गोमंतकी मराठींत गवताच्या पेंढीस वरंड असा शब्द आहे. त्याचें अनेकवचन वण्डी असें करतात. या वरण्डपासून वण्ड–विंड–बिंड असें हें रूप सिद्ध झालें असावें; जसें– संस्कृत करंडक पासून गोमंतकीय कण्डा.

**दोंद** :— तुंद पासून दोंद असें रूप आरंभींच्या त् चा द् होऊन होणें प्रथमच चर्चि-लेल्या नियमाप्रमाणे कठिण आहे. त्याच्या मुळाशीं वर्णव्यत्यय (metathesis) असावा :— तुंद–दुंत–दुंद–दोंद.

**दाम** :— द्रम. या संस्कृत शब्दापासून प्राकृताच्या दम्मु द्वारा मराठींत आला आहे. अुदा० जो पुणु मणि जि खसफसिहुअअु चिन्तअि देअि न दम्मु न रुअअु...... ददाति न द्रम्मं न रूपकम्. शिलालेखांमध्ये हा शब्द फार आढळतो.

अ. का. प्रियोळकर

२

गुंजीकर हा शब्द कुंज (वन) या शब्दापासून आला असेल का हा मूळ विचाराचा प्रश्न, व तो तसा आला असें गृहीत धरल्यास आदि क् चा ग् होतो की नाही हा दुसरा प्रश्न. कोण-त्याहि प्राकृत व्याकरणकाराने आदि क् चा ग् होतो असा नियम दिलेला नाही. प्राकृत भाषा संस्कृताअितकी नियमबद्ध नसली तरी जे कांही सर्वसाधारण नियम सर्व प्राकृत व्याकरणांतून सांपडतात तेवढे तरी सर्वसंमत होते असें धरून चालण्यास प्रत्यवाय नाही.

अुदाहरणादाखल जे दोन तीन शब्द दिले आहेत ते सर्व वादग्रस्त आहेत. कन्दुक शब्दा-पासून हेमचंद्र म्हणतो त्याप्रमाणे गेंदुअ शब्द निघाला असें मान्य केलें तरी हें लक्षांत घेतलें पाहिजे की त्या नियमांत हेमचंद्र अपवादात्मक शब्द देत आहे. सबंध व्याकरणांत ज्या अर्थी आदि क् चा ग् होणारा अेकच शब्द त्याने दिला आहे त्या अर्थी हा निदान सामान्य नियम नाही हें स्पष्ट आहे. हेम० ८.१. हे सर्व निपात (अपवाद) आहेत.

**जुगार** :— ह्या शब्दाचें जरी पोर्तुगीज (Jogar) शब्दाशीं साम्य असलें तरी तो शब्द सं. द्यूतकार, प्रा. जूअगर, म. जुगार असा येणें अशक्य नाही. द्यूतकरं कर्तृवाचक आणि जुगार कर्मवाचक असला तरी असे अर्थभेद होणें अशक्य नाही.

**कामगार** :— (गार हा प्रत्यय पर्शियन असला तरी कामगार हा शब्द कम्मगार या प्राकृत शब्दापासून आला आहे यांत शंका नाही. नायाधम्मकहाओ १.८ मध्ये कम्मगार असा प्रयोग आहे.

**गार** :— पा. स. म. मध्ये गार हा शब्द देशी म्हणून असा दिला आहे. सं. ग्रावन् पासून आला असावा असें केवळ सुचविलें आहे. लिंगव्यत्यय होणें ही गोष्ट प्राकृतांत फारशी

अशक्य नाही (हेम० ८.१.३१ ते ८.१.३६ पाहा.) करक पासून गार शब्द साधावयाचा असेल तर त्याच्या अवस्था पुढीलप्रमाणे होतील:— सं. करक, प्रा. करग (अ)—गार (?).

विंडा:— पिंड पासून विंड निघणें हें अर्थाच्या दृष्टीने योग्य वाटलें तरी भाषाशास्त्राच्या दृष्टीने तें बरोबर होणार नाही. आदि व असंयुक्त प प्राकृतांत तसाच राहतो. वरंड शब्द प्राकृत वाङ्मयांत व कोशांतहि आढळतो. मृच्छकटिकांत वरंडलम्बुकः असा प्रयोग आहे. वरंड पासून विंडा हें रूप साधण्यांत अडचण आहे ती 'र'ची. हा 'र' कसा नाहीसा झाला? विंडा हा शब्द विंटिया (दे०) गाठोडें—भारा या शब्दापासून आला असावा. विं(वें)टलिया असाहि त्याच अर्थी शब्द आहे. मराठी वेटोळें शब्दहि बघावा.

दोंदः— सं. तुंद. येथे प्रथम तोंद व नंतर दोंद असें रूप होणें वर्णविपर्ययाने (metathesis) शक्य आहे. आदि त् चा द् शौरसेनींतहि (तावत्–दाव सोडल्यास) संभवत नाही.

दामः— द्रम्मपासून साधणें शक्य आहे. दमडी शब्द द्रम्मपासूनच आला असला पाहिजे. मात्र सामदामदंडभेद यांतील दाम तसा आलेला दिसत नाही. सं. मध्ये साम्ना दानेन असाच तृतीयेमध्ये प्रयोग आढळतो. प्राकृतमध्येहि सामदंडभेदअुवप्पयाण (प्रदान) असा प्रयोग येतो. तेव्हा मूळ शब्द दान अर्थाचा असून साम शब्दाबरोबर वाटणाऱ्या साम्यामासामुळे दाम असा झाला असावा. जाणून द्रम्म पासून साधलेला नसावा.

ना. वि. वैद्य

——

# 'स्थायिभाव' म्हणजे 'सेंटिमेंट्' की 'इंस्टिंक्ट'?

(लेखक– दे. द. वाडेकर)

१

डॉ. के. ना. वाटवे यांचा कोशस्वरूपी 'रसविमर्श' ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून साहित्याभ्यासी मंडळींत त्यांतील विविध सिद्धान्तांसंबंधी साधकबाधक चर्चा सुरू आहे. रसविमर्शांतील मानसशास्त्रासंबंधी आपले विचार सांगण्याची विनंती 'पत्रिके'चे संपादक प्रा. रा. श्री. जोग व स्वतः 'विमर्श'कर्ते डॉ. वाटवे यांनी केल्यावरून हा लेख लिहिण्यास मी प्रवृत्त झालो आहें. 'विमर्श' ग्रंथांतील समग्र मानसशास्त्रीय विवेचनाचा परामर्श अेका लेखांत घेणें शक्य नाही. येथे सामान्यतः असें निश्चित म्हणतां येईल की आपल्या ग्रंथांतील रसविवेचनास डॉ. वाटवे यांनी मानसशास्त्राचा जो चौथरा वापरला आहे तो बहुतांशीं निर्दोष आहे, व तो त्यांच्या ग्रंथाचा मोठाच अभिनंदनीय विशेष आहे. मराठी साहित्यचर्चेची दृष्टि अर्वाचीन मानसशास्त्राकडे वळविण्याचें मूळ श्रेय जोगांच्या 'अ. काव्यप्रकाशा'कडे गेलें तरी डॉ. वाटवे यांनी या बाबतींत खूपच पल्ला गांठला आहे हें निर्विवाद आहे. 'विमर्शां'तील पहिल्या निकषांत त्यांनी मानवी स्वभावाच्या मानसशास्त्रीय अुपपत्तीची मॅक्डुगलमतास अनुसरून जी रूप-

रेषा दिली आहे तीवरून, व त्यानंतर त्या अुपपत्तीचा त्यांनी ठिकठिकाणीं जो साक्षेपी प्रपंच मांडला आहे, त्यावरून त्यांचा मानसशास्त्राचा दृढाभ्यास व त्यांची साहित्यमानसविवेचक दृष्टि यांचा अुत्तम प्रत्यय येतो. त्यांच्या ग्रंथाच्या या विशेषाबद्दल डॉ. वाटवे यांचें मी प्रथम मनःपूर्वक अभिनंदन करतों.

डॉ. वाटवे यांच्या कामगिरीचें स्वरूप स्थायिभावविषयक अेखादी अगदीच नवीन अशी अुपपत्ति मांडण्याचें नाही किंवा मानसशास्त्रविषयक अेखादा शोध लावण्याच्या स्वरूपाचेंहि नाही. त्यांच्या कामगिरीचें महत्त्व जुन्या संस्कृत साहित्यशास्त्रांत जी मानसशास्त्रीय चर्चा आली आहे तिची तुलना नवीन म्हणजे पाश्चात्य मानसशास्त्राशीं करून ‘जुने स्थायिभाव हे नवीन सेंटिमेंटस्शीं अेकरूप किंवा अभिन्न आहेत’ हें दाखविण्याच्या प्रयत्नांत आहे. प्रस्तुत लेखांत स्थायिभावांचीं व सेंटिमेंट्चीं ग्रंथान्तरीं अुपलब्ध असलेलीं जीं वर्णनें-लक्षणें आहेत तींच तुलनात्मक दृष्टीने तपासून पाहून त्यांतील वर्ण्य विषय हे अेकच आहेत की काय हें पाहावयाचें आहे.

२

प्रथमतः स्थायिभावांचें स्वरूप पाहूं. डॉ. वाटवे यांनी ‘विमर्शा’तील ‘रससामग्री’ या दुसऱ्या निकषाच्या परिशिष्टांत त्यासंबंधीचीं महत्त्वाचीं मूळ वचनें अेकत्र दिलेलीं आहेत. त्यांवरून अेवढें प्रथमच दिसतें की त्यांत स्थायिभावांच्या शास्त्रशुद्ध व्याख्या दिलेल्या नसून ढोबळ गुणविशेषांचें वर्णन तेवढें येतें. या वर्णनांतील गुणविशेषांच्या उल्लेखांचें वर्गीकरण केल्यास पुढील सहा गुणविशेष ‘स्थायिभावा’च्या कल्पनेंत संस्कृत साहित्यकारांस अभिप्रेत होते असें दिसून येतें :—

**पहिला** विशेष **सहजातत्व–** अथवा **सहजातवासनात्व.** अभिनवगुप्त त्याविषयी म्हणतो– **जात** अेव जन्तुः अियतीभिः संविद्भिः परीतो भवति. हेमचंद्र काव्यानुशासनांत ‘सामाजिकानां **वासनारूपेण** स्थितः स्थायीभावः’ असें म्हणतो. **दुसरा** विशेष **प्रमुखत्व-प्रभाविंत्व-प्रभुत्व.** भरत ‘अेवं हि **सर्वभावानां भावः** स्थायी महानिह’ असें म्हणतो तर रसतरंगिणीकार भानुदत्त ‘**सकलप्रधानो** मनोविकार इतिं वा स्थायीभावः’ असें लिहितो. **तिसरा** विशेष **इतर भावांकडून तिरोहित न होण्याची किंवा झांकळून न जाण्याची शक्ति.** ‘विरुद्धैरविरुद्धैर्वा भावैर्विच्छिद्यते **न** यः (दशरूपक)’, ‘सजातीयविजातीयैः **अतिरस्कृतमूर्तिमान्** (र. गंगाधर)’, ‘विरुद्धा अविरुद्धा वा यं **तिरोहितुमक्षमाः**’ (सा. दर्पण) अशीं त्याचीं वर्णनें आढळतात. **चौथा** विशेष **इतर भावांना आत्मसात् करण्याची शक्ति.** ‘**आत्मभावं नयत्यन्यान्** स स्थायी’ (दशरूपक), ‘विरुद्धान् अविरुद्धान् च **भावान्** यो **वशतां नयेत्**’ (साहित्यकौमुदी) असे या स्वरूपाचे अुल्लेख आहेत. **पांचवा** विशेष **चिरास्तित्व–स्थिरत्व–अनुस्यूतसूत्रत्व** पुढील वचनांवरून स्पष्ट होतो. ‘**चिरं** चित्ते अवतिष्ठन्ते’ (स. कंठाभरण), ‘तत्र **आप्रबन्धं स्थिरत्वाद्**मीषां भावानां स्थायित्वम्’ (र. गंगाधरः)’ **स्रक्सूत्रवृत्त्या** भावानामन्येषां अनुगामिकः’ (टीका– सा. दर्पण). **सहावा** विशेष **आनंदांकुरत्व-चर्वणापात्रत्व** असा पुढील वचनांवरून दिसतो. ‘**आनंदांकुरकंदोसौ** भावः स्थायीति संज्ञितः’ (सा. दर्पण), ‘स्थायी एव तथा **चर्वणापात्रम्**’ (अभिनवगुप्त). या सर्व अुल्लेखांचा मथितार्थ असा निघतोः स्थायिभाव हे मानवी स्वभावांतील (१) सहजात, (२) (अ) प्रमुख, (आ) इतरांस न जुमानणाऱ्या, (इ) किंबहुना, त्यांस पचविणाऱ्या, (ई) त्यांत स्थिरानु-

स्यूत असणाऱ्या, (३) आस्वाद्य वासना (म्हणजे प्रेरणा) होत. थोडक्यांत म्हणजे स्थायिभाव हे मानवी स्वभावांतील प्रमुख, प्रभावी, सहज वासना किंवा प्रेरणा या स्वरूपाचे घटक होत.

३

आता पाश्चात्य मानसशास्त्रांतील 'सेंटमेंट्'चें स्वरूप पाहावयाचें. त्या मानसशास्त्रांतील 'सेंटिमेंटस्'चा सिद्धान्त फार जुना नाही. अलेक्झांडर शँड् आणि विल्यम् मॅक्डुगल हे या सिद्धान्ताचे आद्य प्रणेते होत. त्यांनी 'सेंटिमेंटस्'चें सिद्धान्तन केल्यानंतर अितर अनेक मानसशास्त्रज्ञांनी त्यांचा स्वीकार केला. प्रथमतः शँड् आणि मॅक्डुगल् यांचीं सेंटिमेंटस्च्या स्वरूपाविषयींचीं मतें शक्य तों त्यांच्याच शब्दांत सांगून मग अितरांनी 'सेंटिमेंटस्'चें स्वरूपलक्षण कसें केलें आहे तें पाहूं.

शँड्—यांनी स्वतः 'सेंटिमेंट्'ची सूत्ररूप अगर अेखाद्या सुटसुटीत वाक्यांत एकच व्याख्या दिलेली नाही. परंतु त्यांनी सेंटिमेंट्स्चें स्वरूपवर्णन सोदाहरण केलें आहे. त्यांतीलच परिभाषा वापरून अितर अधिकारी लेखकांनी शँड्ची सेंटिमेंट्ची भाषा बनविली आहे.•

(१) "Mr. Shand points out that our *emotions*, or more strictly speaking, our *emotional dispositions*, tend to become *organised in systems* about the various *objects* and *classes of objects* that excite them. Such an *organised system of emotional tendencies* is not a fact or mode of experience, but is *a feature of the complexly organised structure of the mind* that underlies all our mental activity. To such an *organised system of emotional tendencies, centred about some object* Mr. Shand proposes to apply the name "Sentiment."

(McD. Intro. Soc. Psy. p.105.)

(२) "Mr. Shand defines a *sentiment* as '*an organised system of emotional tendencies* centred about some *object*."

"The *Sentiments* then, according to Mr. Shand, are a series of *permanent possibilities* of combining certain *emotions* in connection with objects or circumstances *in our experience*."

(Sir John Adams, Every Man's Psychology, p.379.)

(३) "The *dispositions* of love, hate, respect, etc. have been called '*sentiments*' by Shand. ... Shand describes the *sentiments* as the *greater systems* in which the *emotions* are organised."

(Dr. R. H. Thouless, General and Social Psychology, p.96.)

(४) "*Sentiment* ... 2. *an acquired disposition* to certain types of *emotional experience* and action in relation to some one *object* or to any object of some one kind (Shand.)"

(Mr. H. C. Warren, Dictionary of Psychology, p.248.)

मॅक्डुगल यांनी स्वतः 'सेंटिमेंट्'च्या व्याख्या व वर्णनें अनेक ठिकाणीं केलीं आहेत. त्यांपैकी प्रातिनिधिक व्याख्या येथे देतों:—

(५) "A *sentiment* is an *organised system of emotional dispositions* centred about the idea of some *object*." (Introd. Soc. Psy. p.137)

(६) "A *sentiment* involves an individual *tendency to experience certain emotions* and desires in relation to some particular *object*. It is an *enduring conative attitude* toward some object *induced by experience* of that object." (An Outl. of Psy. p.419.)

(७) "The essential nature of a *sentiment*, the scheme or plan of it is, then, a *mental system* in which the cognitive ability, in older terminology, an 'idea') has become, *through the individual's experience* functionally linked up with one or more native propensities, linked in such a way that, when the ability comes into play (i.e. when the corresponding object is perceived or otherwise thought of) the propensity also is brought into action and engenders its peculiar *emotional tendency* directed upon the *object*."

स्टाउट्: (८) *Dispositions* to experience a variety of *emotions* in relation to some *specific object* constitute a *sentiment* when there is some persistent primary tendency in relation to that object."

(Dr. G. F. Stout's A Manual of Psychology, p.376.)

कॅटेल्: Cattel first harks back to *conditioning* of reflexes, and points out how in the same way, the original instinctive *emotions* also may be *conditioned to objects* so as to give rise to most *complex emotions*, and thus new and complex reaction-modes may be *built* up on the nervous system. (९) "These *new habits built up in the nervous system* are called 'sentiments'. Just as the artist can build up from three primary colours an unlimited number of new tints, so we, from our fourteen or more primary instincts, can construct a tremendous heirarchy of sentiments, which may, in the end, almost obliterate the original instinctive behaviour."

(R. B. Cattell's Your Mind and Mine, pp.174-175.)

ब्रिटानिका ज्ञानकोश: (१०) "*Sentiment*, in psychology, means a constellation or *system of emotional dispositions* related to some *person or object*. Love, friendship and reverence, e. g. are sentiments."

(Encyclopaedia Britanica, 14th Edition, Vol.XX, p.331.)

वरील विविध अुतार्‍यांवरून 'सॅंटिमेंट्'चें शॅंड, मॅक्डुगल व त्यांचे अनुयायी यांना अभिप्रेत असणारें स्वरूप विशद होअील. त्यांचा मथितार्थ असा:– सॅंटिमेंट हे (१) मानसिक **अवस्था नव्हेत**, तर **मनोरचनेंतील संस्काररूपी घटक** आहेत. (२) ते सहजात नव्हेत तर अनुभवार्जित होत. (३) त्यांचें स्वरूप वासनिक नव्हे, तर **भावात्म किंवा भावनिक** आहे. (४) ते निर्विषय नसून **सविषय** (म्हणजे कोणत्या तरी विशिष्ट व्यक्ति, किंवा वस्तु, किंवा त्यासंबंधीची कल्पना यांच्या भोवतीं संघटित होणारे) आहेत. थोडक्यांत, सॅंटिमेंट हे मानवी स्वभावांतील **स्वार्जित, भावात्म, विषयकेंद्रित, संस्काररूपी** घटक आहेत.

४

संस्कृत साहित्यशास्त्रकारांचे 'स्थायिभाव' व पाश्चात्य मानसशास्त्रज्ञांचे 'सॅंटिमेंट्स्' यांचीं वास्तव स्वरूपें याप्रमाणे विशद झाल्यानंतर त्यांची प्रत्यक्ष तुलना केल्यास 'स्थायिभाव' व

'सेंटिमेंट्स्' हे अेकरूप नव्हेत हें वेगळें सांगण्याची आवश्यकता वाटत नाही. मुख्यतः 'स्थायिभाव' हे (१) सहज (Innate) व (२) प्रेरणिक (Conative) आहेत, तर सेंटिमेंट हे (१) स्वार्जित (Acquired) व (२) भावात्म किंवा भावानिक (Emotional or Affective) आहेत हे दोन्हींमधील भेद चटकन् लक्षांत येण्यासारखे आहेत. अर्थात् 'स्थायिभाव' काय किंवा 'सेंटिमेंट्' काय हे दोन्हीहि मनाच्या अथवा मानसिक जीवनाच्या प्रत्यक्ष अवस्था (Actual states) नसून ते मनोरचनेंतील संस्काररूपी घटक (Dispositional constituents) अथवा मनाचे रचनिक विशेष (Structural features) आहेत ही वस्तुस्थिति अुभयसामान्यच आहे. मात्र त्यांच्या विषयांच्या बाबतींत 'स्थायिभाव' हे सहज वासनासंस्कार असल्याने त्यांचे विषय निसर्गदत्त असतात व सेंटिमेंट्स् हे स्वार्जित भावसंस्कार असल्याने त्यांचे विषयहि अनुभवदत्त असतात हा फरक येथे नमूद केला पाहिजे. याप्रमाणे 'स्थायिभाव' व 'सेंटिमेंट्' यांचें डॉ. वाटवे यांनी मांडिलेलें समीकरण, त्यासंबंधीचीं अुभयप्रकारचीं वचनें तपासून पाहिल्यास, सयुक्तिक वाटत नाही. स्थायिभावांचीं लक्षणें माझ्या मतें मानसशास्त्रांतील 'सहजप्रवृत्तीं'च्या (Instinct) लक्षणांशीं अधिक जुळतात. तीं कशीं तें आता पाहूं.

५

'स्थायिभावांचीं लक्षणें वर दुसऱ्या परिच्छेदांत साहित्यग्रंथांतील वुल्लेखांचें वर्गीकरण करून मांडिलींच आहेत. आता 'सहजप्रवृत्ति' किंवा 'Instinct' या मानसिक घटनेचीं लक्षणें मांडावयाचीं. पाश्चात्य मानसशास्त्रांतील 'सहजप्रवृत्ति' या मानवी स्वभावाचे निसर्गदत्त मूळ घटक होत या भूमिकेचा अलीकडील सर्वांत मोठा पुरस्कर्ता म्हणजे विल्यम् मॅक्डुगल होय. त्याने आपल्या सर्व ग्रंथांत या भूमिकेवरून मानवी सामाजिक जीवनाचें विवेचन केलें आहे. या शास्त्रज्ञाचा पहिला मोठा ग्रंथ 'An Introduction to Social Psychology' या ग्रंथांत दिलेली Instinct अथवा 'सहजप्रवृत्ति' हिची व्याख्या देतों :—

(१) We may, then, define an *instinct* as an *inherited* or *innate* psychological *disposition* which determines its possessor to *perceive*, and pay *attention to*, *objects* of a certain class, to experience an *emotional excitement* of a particular quality upon perceiving such an object, and to act in regard to it in a particular manner, or, at least, to experience *an impulse to such an action*."

(W. McDougall, An Outline of Social Psychology, p.23.)

जवळ जवळ याच प्रकारची व्याख्या मॅक्डुगल यांनी नंतरच्या आपल्या Outline of Psyohology या ग्रंथांत जवळ जवळ याच शब्दांत दिली आहे. (An Outline of Psy. चौथी आवृत्ति, पृ.१०० पाहा.) मॅक्डुगल यांनी मानसशास्त्रावरील आपला शेवटचा महत्त्वाचा ग्रंथ 'The Energies of Men' हा लिहिला, त्यांतहि त्यांनी याच भूमिकेचें समर्थन केलें आहे; परंतु त्यांत सहजप्रवृत्तीस Instinct अैवजीं 'Propensity' हा शब्द वापरला आहे, अेवढेंच. (The Energies of Men, तिसरी आवृत्ति पृष्ठें vi, २६, ६४ आणि ११८ पाहा.) या सहजप्रवृत्तींचें किंवा Instincts चें मानवी जीवनांतील महत्त्व मॅक्डुगल यांनी पुढीलप्रमाणे वर्णिलें आहे :—

(२) "We may say, then, that directly or indirectly the instincts are the *prime movers* of all human activity; by the conative or

impulsive force of some instinct (or of some habit derived from an instinct), every train of *thought*, however cold or passionless it may seem, is borne along towards its end, and every bodily activity is initiated and sustained. The instinctive impulses determine the *end* of all activities and supply the driving power by which all *mental activities* are sustained; and all the complex *intellectual apparatus* of the most highly developed mind is but a means towards these ends, is but the instrument by which these impulses seek their satisfactions, while *pleasure and pain* do but guide them in their choice of the means." (op. cit. p.38.)

सहजप्रवृत्ति (Instinct) व भाव (Emotion) यांचे संबंध घनिष्ठ आहेत– विशेषतः सहजप्रवृत्तींचा व्यापार सुरू झाल्यानंतर त्यांतच भाव-भावनांचा सहजोद्भव होतो. हाहि सिद्धान्त मॅक्डुगल यांनी अनेक ठिकाणीं मांडिला आहे. पैकी अेक उतारा पुढे देतों :—

(३) "Emotion is regarded as a mode of experience which accompanies the working within us of instinctive impulses. It is assumed that human nature (our inherited inborn constitution) comprises instincts; that the operation of each instinct, no matter how brought into play, is accompanied by its own peculiar quality of experience which may be called a primary emotion; and that, when two or more instincts are simultaneously at work in us, we exprience a confused emotional excitement (secondary or blended emotion) in which we can detect something of qualities of the corresponding primary emotions. The human emotions are then regarded as clues to the instinctive impulses, or indications of the motives at work in us." (An Out. of Psy. pp.127-128.)

आंग्ल मानसशास्त्रज्ञांत जेम्स् ड्रेव्हर यांसहि महत्त्वाचें स्थान आहे. त्यांच्या अेका ग्रंथांतील 'सहजप्रवृत्ती' संबंधीचा अेक अुतारा खाली देतों :—

"When we seek *the motives for the man's acts* we find that they reduce themselves on analysis to certain *motives more or less characteristic* of *human nature in general*. ... Moreover, these motives are *innate* ... . The human being comes into the world with certain *active tendencies*. ... . The active tendencies ... may be designated *instincts*. ... These instincts are experienced as *impulses*, each accompanied by a *feeling or interest*, *evoked* by certain particular *objects*, *situations*, or other *experiences*, and manifesting themselves in more or less definite kinds of behaviour."

(J. Drever, The Psychology of Everyday Life, 6th Edn., p.20.)

अवढे उतारे प्रातिनिधिक व पुरेसे आहेत असें वाटतें. या अुताऱ्यांचा मथितार्थ काय निघतो ? Instincts या मानवी स्वभावांतील (१) **सहजात**, (२) **प्रभावी**, (३) **प्रवृत्ति-संस्कार** होत. या प्रवृत्ति मनुष्याच्या सर्व शारीरिक व मानसिक– **बौद्धिक**, **भावनिक** व **प्रेरणिक**-व्यापारांच्या बुडाशीं वसणाऱ्या (४) **स्थिरशक्ति** होत. विशिष्ट वस्तु, परिस्थिति

अगर अनुभव यांच्या चोदनेने त्या जागृत होतात, व या जागृतींतून सर्व प्राथमिक व दुय्यम (व साधितहि) भाव-भावनांचा खेळ उद्भुत होतो. सर्व विचार, व्यापार, सुखदुःखादि भावना या मूळ प्रवृत्तींशीं (५) सेव्यसेवकभावाने अगर साधनसाध्यभावाने निगडित आहेत. या प्रवृत्तींचा संतोष हेंच जीवननाट्याचें संविधानक अथवा जीवनकाव्यांतील रस.

सहजप्रवृत्तींच्या स्वरूपाबद्दलचा वरील निष्कर्ष व परिच्छेद २ मधील स्थायिभावां-संबंधीचा निष्कर्ष यांची तुलना केल्यास त्यांत बरेंच साम्य असल्याचें दिसून येअील; निदान मला तसें तें निश्चित दिसतें. वाचकांस दिसतें कीं नाही तें त्यांनी ठरवायचें आहे. मला स्वतःला स्थायिभाव म्हणजे सेंटिमेंट्, किंवा भावगंड, अगर स्थिरवृत्ति नसून मॅक्डुगलची ॲिंटिक्ट किंवा प्रोपेन्सिटी अथवा सहजप्रवृत्ति किंवा स्थिरप्रवृत्ति होय असें वाटतें.

सुदैवानें या विषयाचा अभ्यास केलेल्या दोन ख्यातनाम लेखकांनी या मतास पुष्टि दिलेलीहि मला आढळली. त्यांपैकी अेक साहित्यशास्त्राभ्यासी पंडित व दुसरे मानसशास्त्रज्ञ आहेत. त्यांचे अुतारे देतों :—

"Potential ever, though made kinetic on occasions, *these impressions or instincts* (if that is a better term) are appropriately styled स्थायिभावs or permanent mental conditions."

(Pandit L.P.P. Shastri, The Philosophy of Aesthetic Pleasure, p.171.)

"Hindu psychology too starts with the innate endowment of the human mind. The concept of *Vāsanā* indicates clearly that our thinkers believed that the fundamental elements of mental structure were inherited.... . The स्थायिभावs are undoubtedly the most elementary and fundamental units of mental structure ... . The स्थायिभावs are the propensities of Western psychology."

(Prof. P. S. Naidu, The Rasa Doctrine and the Concept of Suggestion in Hindu Aesthetics, Journal of the Annamalai University, Vol.X, 1940, p.8.)

स्थायिभाव आणि सेंटिमेंट यांचें स्वरूपैक्य दाखविण्याकरिता डॉ. वाटवे यांनी जो खंडनमंडनात्मक विस्तार केलेला आहे त्याचा परामर्श स्थलाभावीं येथे गाळला आहे. येथे अेवढेंच सांगतां येअील की या दोहोंत वाटणारें साम्य केवळ आकारिक (Formal) आहे, वास्तव (Material) नाही. प्रा. जोग यांनी स्थायिभावांचें सादृश्य सेंटिमेंटपेक्षा Primary Emotionsशीं अधिक आहे असें म्हटलें आहे (म. सा. पत्रिका, अंक ६५, पृ. ५८). शॅंड्च्या मताने Primary Emotions या मनुष्यस्वभावाचे मूळ घटक होत. परंतु हें मत आजकालच्या मानसज्ञांस मान्य नाही. Emotions या मनाच्या तत्कालीन अवस्था आहेत, स्थिरप्रवृत्ति नव्हेत. तेव्हा त्या स्थायिभाव होणार नाहीत, हेंहि वरील विवेचनावरून कळून येईल.

अनुक्रमणिका

# बोलभाषांचा प्रश्न

(लेखक– श्री. ग. वा. तगारे)

महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचे प्रसंगीं प्रसिद्ध होणाऱ्या या अंकांत मी अेका महत्त्वाच्या प्रश्नाकडे वाचकांचें लक्ष वेधणार आहें. अतिपरिचय, अनास्था, अज्ञान व आत्मतुष्टि यांपैकी कुठल्या तरी कारणानें मराठी बोली साहित्यिकांकडून, भाषाशास्त्रज्ञांकडून व त्यांचे भाषकांकडून अुपेक्षिल्या जाअून मृत्युपंथास लागल्या आहेत. प्रादेशिक वाङ्मय निर्माण करणारा हार्डी मराठींत केव्हा होणार असेल तो होवो, पण मराठीचे प्रादेशिक विशेष व तिच्या बोलभाषांतील जानपद्वाङ्मय जसेंच्या तसें संकलित करणें मराठी भाषा, इतिहास, संस्कृति व वाङ्मय या दृष्टींनी जरूर आहे.

कां कुणास ठाअूक पण मराठी बोलभाषांबद्दल सर्वांनाच हीनगंड झाला आहे. भारतवर्षांतील कोणत्याहि जातीला बुद्धिमत्ता व कर्तबगारी यांत हार न जाणाऱ्या चित्पावन-सारस्वतांच्या बोलींत असा काय दोष आहे की त्याबद्दल इतका कमीपणा वाटावा ? परमामृत किंवा विवेकसिंधु यांच्या भाषेला तिचीं आजचीं संतानें कां अवमानतात समजत नाही ? एकनाथ-दासोपंतांचे काळीं भागवतांतील तत्त्वज्ञानानें आणि रामायण-महाभारतांतील सुरस कथांनी अखिल महाराष्ट्राला मोहिनी घालणारी मराठवाड्यांतील बोली टाकाअू आहे काय ? अुपर्युक्त ग्रंथांतील भाषा त्या त्या विभागांतील बोलींचें शिष्टरूप असेल पण महाराष्ट्र-सारस्वताला आजचें सौंदर्य आणि वैभव प्राप्त होण्याचें श्रेय नागपूर ते गोमांतकपर्यंत पसरलेल्या या भूविभागांतील बोलींना नाही काय ? साराश, मराठी बोलींबद्दल वाटणारा न्यूनगंड अज्ञानमूलक आहे.

या अुपेक्षेचें दुसरें कारण आत्मतुष्टि. दुर्दैवानें महाराष्ट्रांत इतके थोर पुरुष होऊन गेले आहेत की त्यांच्या विभूतिपूजेपलीकडे कांहीच कार्य अुरलें नाही असें पुष्कळांना वाटतें. 'दुर्दैवानें' म्हणावयाचें कारण आपण त्या थोर व्यक्तींच्या प्रेमानें इतके आंधळे झालेले असतों की ज्या तत्त्वासाठी व कार्यासाठी त्यांनी देह झिजविले तें कार्य बाजूला पडतें. पहिलीं विल्सन फायलॉजिकल लेक्चर्स एका महाराष्ट्रीयानें दिलीं, भारतीय आर्य भाषेच्या दृष्टीनें प्रथम मराठीचा अभ्यास केला गेला इत्यादि विधानें ठीक आहेत. पण बंगाली बोलींचे अभ्यास किती सूक्ष्म व प्रगत आहेत, अवधी किंवा व्रज या हिंदी पोटभाषांवर प्रमाणभूत ग्रंथ निर्माण व्हावे आणि कोकणीखेरीज अितर मराठी बोलींची शोचनीय अुपेक्षा असावी हें दृश्य भाण्डारकर-राजवाड्यांच्या परंपरेस शोभत नाही. सरकारी रीत्या झालेली भाषिक पाहणी (Linguistic Survey of India) ज्यांच्या आत्मतुष्टीचें कारण आहे त्यांच्या अज्ञानाची कींव येते. सरकारी भाषिक पाहणींतील दोष मीं याच पत्रिकेंतून दाखविले असल्यामुळे त्यांची पुनरुक्ति न करतां त्यांपेक्षा अधिक शास्त्रशुद्ध पद्धतीनें संकलन व अभ्यास करण्याची वेळ आली आहे अेवढेंच सुचवितों. कोकणी-अहिराणीसंबंधी मराठीचे झालेले हाल Linguistic Survey च्या सदोषपणामुळे झाले असें म्हटलें तर तें अवास्तव ठरेल काय ?

वस्तुतः हा प्रश्न अत्यंत निकडीचा झाला आहे. वाङ्मयस्थैर्य नसल्यामुळे ही भाषिक संपत्ति आपल्या दिरंगाईनें झपाट्यानें नाहीशी होत चालली आहे. शिक्षणाचा प्रसार, बोलपट, रेडिओ, वर्तमानपत्रें, दळणवळणाची सुलभता यांमुळे नागरबोलीनें ग्रामीण जीवन व्यापून जात आहे. अुपर्युक्त गोष्टी चांगल्या आहेत याबद्दल मतभेद नाही, पण जानपद्वाङ्मय व बोली यांच्यावर त्यांचा मारक परिणाम होत असल्यामुळे त्या वाङ्मयाचा व बोलींचा प्रातिनिधिक संग्रह होणें निकडीचें आणि आवश्यक होअून बसलें आहे.

———

# गेल्या वर्षांतील अध्यक्षीय भाषणें*

(लेखक – श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर)

अलीकडच्या वाङ्मयसमारभांत 'तोचतोपणा' दिसून येतो अशी तक्रार त्या समारंभाचे भागीदारच करतांना दिसतात. वार्षिक समालोचनाच्या दूरस्थ गवाक्षांतून या समारंभांत भाग घेणाऱ्या मजसारख्या अप्रत्यक्ष भागीदारास तसें वाटल्यास नवल नाही. तथापि केवळ प्रेक्षकाची भूमिका सोडल्यास या विविध भाषणांतून आणि समारंभांतून अेक सांवळी, संघर्ष, आणि प्रगति निर्माण होत आहेसें दिसेल.

यंदा पत्रिकेतर्फे मजकडे आलेल्या अध्यक्षीय भाषणांतील नव्या-जुन्यांचें प्रमाण सांगण्या-सारखें आहे. दोन भाषणें जुन्यांचीं म्हणजे सर्वपरिचित व सर्वमान्य साहित्याग्रणींचीं आहेत; तर तीन नवीनांचीं आहेत. पहिले दोन म्हणजे साहित्यसंमेलनाध्यक्ष अत्रे आणि निजामप्रांतीय सम्मेलनाध्यक्ष पोतदार. पुढील तीन म्हणजे तर्कतीर्थ जोशी, कुसुमावतीबाई आणि डांगे हे होत. अुत्तरोक्त नवीन तिघांपैकी दोघे– जोशी व डांगे– साहित्यिक म्हणून नव्हेत, तर कम्यूनिस्ट म्हणून प्रसिद्ध आहेत ही गोष्टहि अर्थपूर्ण आहे.

गेल्या कांहीं वर्षांतील अध्यक्षीय विचारांत सहज लक्षांत भरण्यासारख्या गोष्टी म्हणजे (१) प्रचलित कथावाङ्मयासंबंधी असंतोष, (२) आन्तरराष्ट्रीय राजकारणाशीं वाङ्मयाचा संबंध जडून यावा अशी आकांक्षा, (३) सामाजिक आणि साहित्यविषयक प्रश्नांचा विचार करतांना मार्क्सवादी दृष्टि लावण्याचा आग्रह. पत्रिकेपुढील यंदाच्या भाषणांतहि वरील गोष्टी न चुकतां आढळतील. अखिल महाराष्ट्रीय असो की स्थानिक असो– एखाद्या वार्षिक मेळाव्याकरितां निवड-लेल्या व्यक्तींच्या भाषणांत अुच्चनीच प्रतवारी लावणें अर्थातच अस्थानीं ठरेल. तरी अेक विचार हीं भाषणें साकल्यानें वाचणाऱ्याच्या मनांत आल्यावांचून राहणार नाही– की नव्या आकांक्षा आणि नवे निकष मांडण्यांत देखील आमचे जुने सर्वमान्य साहित्यिकच पटाईत आहेत. फडक्यांचें रत्नागिरीचें भाषण, खांडेकरांचें सोलापूरचें व अत्र्यांचें नाशिकचें भाषण हीं तीन लोकप्रिय भाषणें अेका हातांत आणि पु. य. देशपांडे, तर्कतीर्थ जोशी, तळवळकर, कुसुमावतीबाई, काणेकर, जावडेकर यांचीं भाषणें अेका हातांत अशी तुलनेकरितां धरल्यास पहिल्या पारड्यांत प्रसाद आणि दुसऱ्या पारड्यांत क्लिष्टता पडल्याचा भास होईल !

अर्थात् हा क्लिष्टतेचा दोष या दुसऱ्या वर्गांतीलहि सर्वांत समान आहेसें नव्हे; आणि ज्यांच्यांत तो पराकोटीस गेला आहे त्यांच्यांतहि तो सर्वस्वीं वक्त्यांचा नसून अंशतः वक्तव्या-चा– अर्थात् विषयाचा आहे. नवे विचार आणि नवी परिभाषा यांचा चौफेर वेढा पडल्यामुळे या मंडळींचें व्यक्तिमत्त्व आणि विषय गुदमरून गेल्यासारखे भासतात. तथापि नव्या प्रवाहांतून

---

* समालोचित भाषणांचे कर्ते:—श्री. अत्रे, श्री. पोतदार, श्री. (तर्कतीर्थ) जोशी, सौ. कुसुमावती देशपांडे, श्री. (भाई) डांगे.

जुन्या प्रवाशांना सुखरूप पैलतीराला नेण्याच्या कौशल्याच्या दृष्टीने रा. अत्रे यांचें नाशिक येथील भाषण वाखाणण्यासारखें आहे.

नाशिक येथील संमेलन अत्यंत क्षुब्ध अशा राजकीय परिस्थितींत भरलें. त्या परिस्थितींत वाङ्मयाचा पदर राजकारणाला नेऊन भिडविण्याचा अलीकडचा शिरस्ता पाळूनच केवळ भागण्यासारखें नव्हतें. राजकारणाचा अुच्चारच करायचा म्हटला तर देशाची सर्वमान्य राजकीय संस्था खणून काढली जात असल्यामुळे क्षुब्ध झालेल्या जनतेला आपले वाटतील असे राजकीय विचार बोलणें जरूर होतें. रा. अत्रे यांच्या राजकीय आचारासंबंधी कोणत्याहि पक्षाचें कांहीहि म्हणणें असो, गेल्या वर्षांच्या राजकीय मनःस्थितीस मानवणारा अध्यक्ष रा. अत्रे यांचेखेरीज अन्य शोधून काढायचा म्हटल्यास साहित्येतर क्षेत्रांतीलच काढावा लागला असता ! आणि तोहि तुरुंगांतच आढळला असता !

राष्ट्रीय मनःस्थितीला धैर्याने व समरसतेने वाचा फोडण्याचें कार्य तर रा. अत्रे यांनी केलेंच पण त्याबरोबर प्रचलित वाङ्मयीन वादांनाहि त्यांनी निःसंदिग्ध भाषेंत बहुधा अचूक अशींच अुत्तरें दिलीं आहेत. अैदी धनिकांच्या सावलींत खरें वाङ्मय निर्माण होत नाही असें त्यांनी बजाविलें आहे. अुत्तरकालीन संस्कृत वाङ्मयांतील पांचट शृंगाराचें साम्राज्य अन्यांचें विधानच सिद्ध करील. आजकालच्या नियतकालिक आणि ग्रंथनिविष्ट वाङ्मयासंबंधी रा. अत्रे यांनी दाखविलेला आशावादीपणाहि त्यांची अचूक दृष्टीच दर्शवितो. आजच्या वर्तमानपत्री वाङ्मयांत अनेक ठळक दोष आहेत; तरी लोकशिक्षणाचें कार्य हे यंत्रारूढ दैनिक व साप्ताहिक लोकशिक्षक अितक्या बहादुरीने करीत आहेत की नुसता त्यांच्या दोषांचाच जप करणें हें कृतघ्नपणाचें ठरेल. महाराष्ट्राचे आजकालचे ग्रंथकार अर्धपोटीं राहून, पोटाकरिता वेगळा धंदा संभाळून जी वाङ्मयीन कामगिरी करीत आहेत तिजसंबंधी अत्रे यांनी व्यक्त केलेली आश्चर्ययुक्त कृतज्ञता अधिकच युक्त होय.

पण रा. अत्रे यांनी मांडलेला त्याहून महत्त्वाचा मुद्दा म्हणजे ललितवाङ्मयासंबंधीचा. शास्त्रीय वाङ्मय हें अुच्च वाङ्मय आणि ललितवाङ्मय हें हीन वाङ्मय असें समजणारा विद्वानांचा (?) अेक वर्ग महाराष्ट्रांत आहे ही गोष्ट प्रसिद्धच आहे. अेवंगुणविशिष्टमंडळी अुच्च साहित्यसंमेलन हें नांव घेअून शास्त्रीय वाङ्मयाची अेक परिषदहि पुण्यास भरवीत असते. ही समजूत अरसिकपणाचीच नव्हे तर अशास्त्रीयहि आहे हें सहज समजण्यासारखें आहे. तथापि या विषयावर अुघड चर्चा करतांना मात्र हे प्रत्यक्ष घडलेल्या घटनांकडे डोळेझाक करून कोशांतून शब्द काढण्यापासून सुरुवात करून पुस्तकी वाद करतात ! रा. अत्रे यांनी 'शास्त्र' आणि 'वाङ्मय' या कोशगत शब्दांत विरोध आहे की सख्य आहे यावर वेळ न दवडतां समाजांत अुजळ माथ्याने वावरणाऱ्या या अशास्त्रीय शास्त्राभिनिवेशाचा निषेध केला ही अभिनंदनीय गोष्ट आहे. अैत्या तयार असलेल्या शास्त्रांचें पठन-पाठन करण्यास तर अुच्च बुद्धीचें प्रयोजनच नसतें. पण नवीन शास्त्रीय शोधास जी प्रतिभा लागते ती फार तर ललितलेखकांच्या प्रतिभेशीं तुल्य होय. या दृष्टीने पाहतां जुन्या शास्त्रांचा परिचय करून देणारे ग्रंथ प्रतिभायुक्त ललितवाङ्मयाहून श्रेष्ठ समजणारे शास्त्राभिमानी अेक अडाणी परंपरा रूढ करीत आहेत असें म्हणणें प्राप्त आहे. रा. अत्रे म्हणतात, ललितवाङ्मय हेंच राष्ट्रीय वाङ्मय. वस्तुस्थिति अशी आहे की ललितवाङ्मय हेंच काय तें वाङ्मय; शास्त्रीय लिखाण हें केवळ शास्त्र होय. नाही तर वाग्भटाच्या अष्टांगहृदयापासून तों रेल्वे गाइड, अंकलिपि वगैरेपर्यंत सर्वच पुस्तकांस वाङ्मय

म्हणावें लागेल— नव्हे अुषःकालापासून तों अुत्तररामचरितापर्यंत सर्व ललितग्रंथांच्या डोक्यावर स्थान द्यावें लागेल!

पण शास्त्रीय ज्ञानाचा आग्रह अरसिक आणि अललित लेखकच धरतात असें नव्हे तर ललित लेखकांनाहि त्यासंबंधी, दूरस्थ वस्तूविषयी, वाटणारी मोहनी वाटते; कधी कधी तर हीनगंडहि वाटतो. आमच्या ललितलेखकांच्या शास्त्रीय अुल्लेखांत दोष राहूं नये म्हणून त्यांना अनेक शास्त्रांचा ओनामा शिकविण्याचे 'कोर्स' हि कांही लोक सुचवितात! रा. अत्रेहि या मोहापासून अलिप्त नाहीत असें म्हटल्यास या मोहाच्या सार्वत्रिक फैलावाची कल्पना येअील. पांच वर्षांच्या मुलाला कॅन्सर होणें, स्वप्नांतील संभोगाने गर्भधारणा होणें वगैरे गोष्टींचा आमच्या कांही ललितलेखकांनी अुल्लेख केल्याबद्दल अत्रे यांनी खेद केला आहे. या चुका हास्यास्पद होत पण या बाबतींत मी अेवढेंच म्हणेन की अेखादी ललितकृति अितर दृष्टींनी रम्य असल्यास वैद्यकीय दृष्ट्या चुकीच्या विधानाने तिला मोठेंसें वैगुण्य येअील असें नाही; अुलट काव्य किंवा कादंबरी या दृष्टीनेच जीं पुस्तकें भिकार असतील त्यांमधील अशा किरकोळ शास्त्रीय चुका दाखविणें म्हणजे गौण दोषांचा गवगवा करून प्रधान दोषांकडे दुर्लक्ष करणें होय.

रा. अत्रे यांनी पावित्र्यविडंबनासंबंधी दिलेलें समर्थनहि थोडेंसें सदोष आहे. समाजाच्या हिताकरिता समाजाच्या दोषांवर शस्त्रक्रिया करतांना पावित्र्यविडंबन अपरिहार्य आहे असें रा. अत्रे यांचें म्हणणें. पण आजकाल सिनेमागृहें फुलविण्यासाठी आणि साप्ताहिकें खपविण्यासाठी ज्या सवंग कल्पनांचा प्रयोग होतो त्या सर्व अशा हितकारक शस्त्रकर्मांत मोडतात असें रा. अत्रेहि म्हणूं शकणार नाहीत. समाजांतील अन्याय पद्धतशीरपणें पोसवीत पावित्र्याचे देव्हारे माजविणें जसें वाअीट तसेंच कोणताहि हितकर हेतु डोळ्यांपुढे नसतां पवित्र गोष्टींची विटंबना करून खऱ्या रसाची अुणीव भरून काढणें हेंहि वाअीट होय हें रा. अत्रे यांसहि मान्य आहे असें आम्ही त्यांच्या जाहीर व खासगी अुद्गारांवरून म्हणूं शकतों.

यानंतरचें महत्त्वाचें भाषण म्हणजे प्रो. दत्तोपंत पोतदार यांनी नांदेड येथील निजामप्रांतीय सम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेलें. दत्तोपंत पोतदार हे आजच्या भाषिक संसारांचे मुत्सद्दी आहेत. निजाम प्रांतांतील सार्वजनिक जीवनाचा नाजूकपणा लक्षांत घेतां त्यांच्याअितका मुत्सद्दी भाषाप्रभु अध्यक्षपदाकरता निवडण्यांत मराठवाड्यांतील मराठी बंधूंनी योजकपणा दाखविला असें म्हटलें पाहिजे. प्रो. पोतदार यांनी सांगितलेली पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे "भाषा हा आज नुसत्या रंजनाचा विषय राहिलेला नाही; जीवनमरणाचा विषय होअून बसलेला आहे" ही होय. रा. पोतदार यांच्याहून स्वतःस फारच आधुनिक समजणाऱ्या मंडळींच्या प्रत्यक्ष लिखाणावरूनच ठरवावयाचें म्हटल्यास ती मंडळी जुन्या रंजनयुगाच्या पलीकडे अद्याप गेली आहेतसें दिसणार नाही. प्रो. पोतदार यांनी सांगितलेली दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे अर्वाचीन भरतखंडाची शास्त्राध्ययनाची भाषा संस्कृतप्रधानच राहील ही होय. रा. पोतदार यांनी सांगितलेली तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे अनेकभाषापरिचयाचें महत्त्व ही होय. पाश्चात्य लोक पृथ्वीच्या पाठीवर जातील, तेथील भाषा शिकून अनेक समाजांचा परिचय स्वजनांस करून देतील; तर आमचे मराठी देशबांधव परसमाजांत पिढ्यान् पिढ्या राहिले तरी शक्यतों कोरडें राहण्याचा प्रयत्न करतील. कित्येक मंडळी तर अन्य भाषांचें अज्ञान म्हणजेच स्वभाषेचा अभिमान असें समजतात. अशा मंडळींनी प्रो. पोतदारांसारख्या जुन्याच्या अभिमान्याचे हे अुद्गार जरूर लक्षांत धरावे. पण केवळ परभाषा शिकल्याने परसमाजाचें ज्ञान होतें असें नव्हे. मनाचा अुदारपणा, दुसऱ्याचें बरें दिसेल तें घेण्याची— निदान समजून घेण्याची—

तयारी, ही अशा ज्ञानास जरूर असते. संकुचितपणा व गांवढळपणा म्हणजेच स्वाभिमान ही समजूत सुटल्याशिवाय चिनी, जपानी, रशियन भाषांची ओळख होअनहि फायदा होणार नाही.

प्रो. पोतदार यांनी भाषाध्ययनाचें माध्यम संस्कृतप्रधान देशी भाषाच राहतील हें सांगून अुस्मानिया विद्यापीठ स्थापतांना झालेला मूळ प्रमाद फिरून अेक वेळ जनतेच्या व राज्यकर्त्यांच्या निदर्शनास आणलेला आहे. या मुद्याचें महत्त्व वेगळें सांगितलें पाहिजे असें नव्हे. तथापि अितका अुघड मुद्दा जेव्हा आला हजरत निजामसाहेब यांजसारखे राज्यकर्ते किंवा सर अकबर हैदरींसारखे मुत्सद्दी यांस सांगावा लागतो तेव्हा मूळ दृष्टींतच जमीन-अस्मानाचा भेद आहे हें अुघड आहे. अितक्या अुघड गोष्टी सांगण्याची वेळ येअू नये असें वाटत असल्यास हिंदुस्तानांतील सर्वच जमातींनी व समाजांनी निर्जीव परंपरांपेक्षा जिवंत ज्ञान आणि प्रत्यक्ष प्रगति यांस अधिक किंमत देण्यांस शिकलें पाहिजे. ही वैचारिक क्रान्ति घडून येण्यास कवींना 'क्रान्तदर्शी' म्हटलेलें आहे, आणि क्रान्त आणि क्रान्ति हीं दोन्ही पदें अेकाच मूळ धातूपासून सिद्ध होतात या व्याकरणांतील आधाराचा तादृश अुपयोग होअीलसें नाही.

नवीन मंडळींपैकी त्यांतल्या त्यांत वाचनीय भाषण म्हणजे तर्कतीर्थ जोशी यांचें होय. रा. जोशी यांनी केलेला मूल्यविचार ज्यांनीं साहित्याध्ययन केवळ विद्यालयांनी काढून दिलेल्या वाटेनेच (on academic lines) चालें असेल अशा साहित्यिकांस नवीन वाटेल यांत शंका नाही. तथापि विद्यालयांत मान्य नसलेल्या अनेक क्रान्तिकारक विचारसरणींचें अध्ययन आज अनेक व्यासंगी साहित्यिक आस्थेने करीत आहेत. अशा व्यासंगी साहित्यिकांस तर्कतीर्थांच्या या भाषणांत नावीन्यापेक्षा क्लिष्टताच अधिक आहे हें पाहून थोडा खेद वाटेल. वास्तविक न्यायमीमांसादि प्राचीन शास्त्रांची परिभाषा तयार असलेल्या अेखाद्या मार्क्सवाद्याची निवड साहित्यिकांनी आपल्या क्षेत्रांतील मानाकरिता केल्यास मोबदला म्हणून सुगम मांडणी आणि निर्दोष परिभाषा यांची तरी अपेक्षा करावी. पण अेखादें नवें शास्त्र शिकलेले विद्वान् आपली नवी विद्या सुबोध करीत नाहीत अेवढेंच नव्हे, तर श्रोतेहि वक्त्याकडून सुबोधतेची अपेक्षा करीत नाहीत असें पु. य. देशपांडे, तर्कतीर्थ जोशी यांच्यासारख्यांचीं भाषणें वाचून वाटतें.

रा. जोशी यांनी आपल्या भाषणांत प्राधान्येंकरून मूल्यांचें विवेचन केलेलें आहे. भाषणारंभीं त्यांनी Historical realism of values (मूल्यविषयक अैतिहासिक वस्तुवाद) ही अुपपत्ति विस्तारेंकरून सांगितली आहे. या विवेचनांत त्यांनी मूल्य आणि वस्तु यांचा संबंध सांगून मूल्यांची अुत्पत्ति, वाढ व परिवर्तन कसें होतें तें सांगितलें आहे. त्याचप्रमाणे त्यांनी मूल्यांच्या अुच्चनीच श्रेणी अथवा प्रतीहि लाविल्या आहेत; आणि त्यांत अैतिहासिक विकासहि कल्पिला आहे. या सर्व विवेचनांत त्यांनी मार्क्सवादास सुसंगत असें 'मूल्यें देश आणि काल यांनी बद्ध आहेत' हें ध्रुवपदहि राखलें आहे. सदरहू अुपपत्तीबरोबरच त्यांनी अध्यात्मवाद (Transcendentalism) आणि द्रव्यगुणवाद (Physicism) या दोन अुपपत्तींचाहि थोडक्यांत विचार केला आहे. आपल्याकडील अध्यात्मवादी मूल्योपपत्तीचें मूळ अुपनिषदांत आढळतें, तर पाश्चात्यांच्या अुपपत्तीचें मूळ प्लेटोच्या तत्त्वज्ञानांत सापडतें. प्लेटोच्या 'सत्यं शिवं सुंदरम्' या मूल्यत्रयींत किंवा अुपनिषदांच्या सत्, चित्, आनंद या त्रयींत आधुनिक विशद मूल्यविचार सामावणार नाही असें रा. जोशी यांचें म्हणणें आहे.

मूल्यें शाश्वत आहेत की परिस्थितिसापेक्ष आहेत हा वाद प्रसिद्धहि आहे आणि जटिलहि आहे; तसंच हा वाद केवळ साहित्यक्षेत्रीयहि नव्हे. या दृष्टीने मुंबअीच्या गोमांतक

साहित्यसंमेलनापुढे झालेल्या या भाषणाचा विचार करतांना या प्रश्नासंबंधी अुत्तरपक्ष करणें अप्रासंगिक होअील. तरी या बाबतींतील जोशी यांचींच कांही विधानें दुसऱ्या बाजूची कल्पना येण्यास पुरेशीं आहेत. रा. जोशी म्हणतात, "सर्व मूल्यांच्या सामान्य भावरूप कल्पनेच्या आधारें कांही मूल्यें शाश्वत असतात असें कोणी म्हणतात. परंतु मूल्यांच्या शाश्वततेची कल्पना फार जपून व सावधगिरीनेच वापरली तर टीक. कारण शाश्वत कल्पनेच्या आधारें हीन मूल्यांना अुच्च पदवी देण्याचा प्रमाद पुष्कळांच्या हातून सामाजिक राजकीय प्रश्नांच्या विचारांच्या संदर्भांत दिसतो. साधारणपणें मूल्यपरिवर्तनाचें अैतिहासिक तत्त्वच मूल्यांचा अर्थ अधिक चांगल्या रीतीने दाखवितें." दोष शाश्वत मूल्यकल्पनेंत नसून ती वापरणारांत आहे हें वरील विधानांवरूनहि कळण्यासारखें आहे.

वरील सावध विधानाप्रमाणेच रा. जोशी यांनी केलेलें अेक स्पष्ट विधानहि विचारार्ह आहे. ते म्हणतात—

"कलात्मक अनुभवास लौकिक अनुभवापेक्षा भिन्नत्व असल्यामुळे भारतीय प्राचीन साहित्यकारांनी अलौकिक असें म्हटलें...भारतीयांनी त्या अनुभवाची ब्रह्मवादावर आधारलेली अुपपत्ति जरी मांडलेली असली तरी त्यांचें विवरण गूढवादी नाही." मार्क्सवादी लक्ष्मण-शास्त्र्यांनी मान्य केलेली ही गोष्ट मार्क्सवाद्यांनीच नव्हे तर अध्यात्मवादी अुपपत्ति म्हणतांच पिचकणाऱ्या सर्वच आधुनिकांनी लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अध्यात्मवाद म्हणजे गूढवाद नव्हे हें शास्त्रीय दृष्टिकोनाच्या गळीं अुतरल्याने 'गूढवाद म्हणजे भ्रांतिष्टपणा किंवा छादिष्ट-पणा नसून अुच्चतर बुद्धिवाद आहे' हें शास्त्रीय म्हणविणाऱ्या लोकांस पटविणें सोपें होणार आहे. कलाविचाराची मजल येथपर्यंत पोहोचल्याखेरीज कलामीमांसेंतील सांप्रतची तर्कटी, पुस्तकी आणि यांत्रिक दृष्टि निवळणार नाही.

तर्कतीर्थ जोशयांच्या भाषणांतील मूल्योपपत्तीचें विवेचन वाचनीय आहे. पण आमच्या मार्क्सवाद्यांच्या साहित्यक्षेत्रीय प्रवचनांत शेवटीं अुरणारा प्रश्न म्हणजे 'या सर्व विवेचनाचा साहित्याच्या निर्मितीशीं किंवा आस्वादाशीं तरी संबंध कोणता?' रा. जोशी यांनी आरंभीं म्हटलें आहे की कलासमीक्षेचा आणि कलानिर्मितीचा फारसा संबंध नाही; असलाच तर विरोधी संबंध आहे. म्हणजे कलेच्या अुगमाच्या चर्चा सुरू झाल्या की कला अुगमांतच आटली म्हणून समजावें. तसेंच प्राचीनांची कलामीमांसाहि त्यांनी विनतक्रार मान्य केली आहे. अशा स्थितींत हे मूल्यांच्या अुपपत्तीचे व श्रेणींचे वाद अुलगडून त्यांना गोंवेकर साहि-त्यिकांस शिक्षित करायचें होतें की स्तिमित करायचें होतें? अुलट त्यांनी भाषणाच्या मध्यावर 'युगप्रतिनिधीभूत कला पुरोगामित्वाचें ध्येय न ठेवतांहि निर्माण होअूं शकते व ती पुरो-गामिनी होअूं शकते. चालू जीवनांतील संग्राम, वैफल्य व सार्थक्य यांचा अर्थ सांगणारी कला चालू जीवनाची पुरोगामी कला होय' या शब्दांत सांगितलेल्या तत्त्वापासूनच व्याख्यानाची सुरुवात केली असती तरी बिघडलें नसतें. कला आणि नीति, अश्लीलता वगैरे प्रश्नांबाबत रा. जोशी यांनी विशेषसें विचारार्ह सांगितलें आहे असें नाही. अेकराष्ट्रकल्पना अुत्पन्न होण्यास चातुर्वर्ण्यकल्पनेचा मोह सोडला पाहिजे हें त्यांचें म्हणणें योग्य आहे व हेंच हिंदु-स्थानांतील अेक पक्ष अनेक वर्षें सांगत आहे. पण असे अनेक अुपयुक्त पण साहित्याशीं संबंध नसलेले राजकीय विचार त्यांच्या भाषणांत आलेले आहेत. भाषणाचा शेवट नाझी असुरांचा अंत अितिहासक्रमरूप अीश्वरेच्छेने होत आहे— नव्हे तो युगायुगांत होत आला आहे— या श्रद्धाळू भरतवाक्याने झाला आहे! रा. जोशी, यांच्या भाषणांतील अैतिहासिक व सांस्कृतिक

विवेचनावरून हिंदी मार्क्सवादी आपली मूळची संकुचित भूमिका सोडूं लागले आहेत हें दिसून येतें. तथापि रा. जोशी यांच्यासारख्या मार्क्सवाद्यांसहि साहित्याच्या क्षेत्रांत सांगण्यासारखें फारसें नसतें हें स्वाभाविकच आहे.

प्रो. सौ. कुसुमावतीबाओी देशपांडे यांनी मुंबअी-मराठी-साहित्य-संघाच्या वार्षिक दिना-निमित्त केलेल्या भाषणांत मराठी कादंबरीवाङ्मयाची छाननी केली आहे. त्यांच्या भाषणाच्या प्रारंभींच्या भागावर क्लिष्टतेच्या परंपरेची छाया पडली असली तरी त्यांच्या भाषणांतील अर्वाचीन कादंबरीचें परीक्षण निर्दोष आणि पटण्यासारखें आहे. अलीकडील पुष्कळशा कादंबऱ्यांत शास्त्रज्ञान, पुरोगामित्व आणि राजकारण यांच्या देखाव्यांचे पडदे सोडण्याची प्रथा पडलेली आहे. परंतु त्यांचा मूळ प्राण जुन्या पिढीचाच असतो हें त्यांनी मार्मिकतेने दाखविलें आहे. रा. पु. य. देशपांडे यांच्या कादंबऱ्यांतील रूक्षता आणि क्लिष्टता त्यांच्या स्वयंकेंद्रिततेमुळे अुत्पन्न होते हेंहि त्यांनी दाखवून दिलें आहे. आत्मप्रत्यय आणि स्वयंकेंद्रितता यांतील फरकहि त्यांनी मार्मिकपणें दाखविला आहे, व शेवटीं रणांगण ही कादंबरी सर्व आभासांतून मुक्त असल्यने आजकालच्या कादंबऱ्यांत श्रेष्ठ आहे असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

अलीकडील वाङ्मयीन असंतोष व त्यासंबंधी होणारी सार्वजनिक चर्चा यांची माहिती असणारास असें दिसून येअील की सौ. कुसुमावतीबाओींनी व्यक्त केलेला असंतोष गेल्या चार दोन वर्षांत अनेकांनी व्यक्त केला आहे, व त्या असंतोषाचा अेवढा कल्लोळ अुठण्या-पूर्वीहि कित्येक विचारी टीकाकारांनी आधुनिकतेच्या निशाणाखाली जमणाऱ्या या जुनाट सरंजामासंबंधी धोक्याच्या सूचना अनेकवार दिलेल्या होत्या. हें आभासात्मक आणि नकली कादंबरीवाङ्मय वाढण्याचें कारण कांही काल तरी त्यांची अुदो अुदो आज त्यांच्यावर विद्वत्ता-प्रचुर टीका करणारांनी केली होती हेंच होय. आणि आजहि नकलीपणाचे कांही नमुने पुनरा-वृत्तीमुळे टीकाकारांस ओळखूं लागले आहेत अितकेंच. पूर्वीहून वेगळा नकलीपणा वापरल्यास आजचे नकलीपणाचे निषेधकहि त्या जाळ्यांत सांपडतात असा अनुभव आहे. पण त्यामुळे कुसुमावतीबाओींच्या मार्मिक पृथक्करणाची किंमत कमी होते असें नव्हे. कुसुमावतीबाओींच्या भाषणांतील अुणीव ही त्यांच्या दोषदर्शनांत नसून त्यांच्या गुणग्रहणांत आहे. फडके, खांडेकर, माडखोलकर, पु. य. देशपांडे यांचे दोष आजकालच्या प्रत्येक अध्यक्षीय भाषणांत दाखविले जातात यावरून या कादंबरीकारांची पकड कमी झाली असें मात्र मानतां येणार नाही. कारण दोष दाखविणारे टीकाकारहि या चौकडीकडून कांही अपेक्षितां येअील आणि याच चौकडी-कडून कांही अपेक्षितां येअील अशा दुहेरी भ्रमांत घोटाळत आहेत. मग हे टीकाकार यांचा नादच कां सोडीत नाहीत ? याचें कारण अुघड आहे. या चार लेखकांची राळफेक या टीका-कारांच्या ठिकाणींहि अितकी यशस्वी झाली आहे की टीका करण्याच्या निमित्ताने कां होओीना त्यांनी या चारांतून बाहेर पडूंच नये !

पण कुसुमावतीबाईंनी तर या गाजलेल्या कादंबरीकारांबाहेरील अेक कादंबरी दाखवून आपणांस केवळ दोषच दाखवितां येतात असें नव्हे तर गुणहि कळतात हें सिद्ध करण्यास पुरावा दिला आहे. पण हें गुणग्रहणाचें अुदाहरणच त्या अद्याप या राळफेकींतून बाहेर पडूं शकत नाहीत हें सिद्ध करीत आहे. रा. बेडेकर हे आजकालच्या कादंबरीकारांच्या प्रसिद्ध दोषांतून पुष्कळसे मुक्त आहेत हें अितरांसहि मान्य होओील. तरी त्यांचे म्हणून कांही दोष आहेत व ते अितरांच्या दोषांचेच सूक्ष्मरूप होत हें कुसुमावतीबाओींच्या ध्यानीं आलेलें नाही. रा. बेडेकर यांचा नायक कुसुमावतीबाओींप्रमाणेच आभासमय जीवनाचा तिटकारा करतो,

म्हणजे तो वास्तवतेच्याजवळ पोहोचतोच असें नव्हे. अवास्तवता प्रेमाच्या सजल नेत्रांमुळेच अुत्पन्न होते असे नव्हे, तर प्रेमभंगाच्या विषण्ण दृष्टीमुळेहि अुत्पन्न होते. प्रेम अंधळें असतें ही म्हण अेकांगी आहे; दुःखहि तितकेंच अंध असतें; जीवनद्वेषहि तितकाच अंध असतो. जीवनाबद्दल सुंदर आभास घट्ट धरून बसणारे वास्तवतेपासून जितके दूर असतात तितकेच अहंकार दुखावला गेल्याबरोबर सौंदर्याला लाथा मारीत सुटणारे लोकहि असतात. हें परिचित शब्दांत सांगावयाचें झाल्यास रोमॅन्टिसिझम्‌मुळे वस्तुस्थिति दिसेनाशी होते, तशीच सिनिसिझम्‌मुळेहि दिसेनाशी होते. नकली सौंदर्यवादाला विटून नेमकी सिनिसिझम्‌च्या गळीं पडण्याची चूक आजच्यासारख्या वास्तवप्रेमी युगांत जितकी होते तितकी अितर युगांत क्वचितच होत असेल. भ्रमनिरासाचा पुकारा आणि आन्तरराष्ट्रीय घडामोडींची पार्श्वभूमि या तर आजकालच्या फॅशन्सच आहेत. त्या पाळण्यांत रा. बेडेकर हे माडखोलकर, देशपांडे यांच्या पलीकडे गेले असें होत नाही.

दोष शोधतांना असो की गुण शोधतांना असो ज्या बाजूने 'नाझी निर्वासित', 'मजूर राजकारण', 'संज्ञाप्रवाह' यांच्या घोषणा अैकू येत नसतील तिकडे वळण्याअितपत सौ. कुसुमावतीबाअींचा 'भ्रमनिरास' झाला नसल्याने त्यांस ठरलेल्या कादंबऱ्यांहून अितरांचे गुणदोष ओळखतां न आल्यास आश्चर्य नाही.

शेवटचें महत्त्वाचें भाषण म्हणजे भाअी डांगे यांनी ऑल अिण्डिया प्रोग्रेसिव्ह रायटर्स-पुढे केलेलें होय. रा. डांगे यांचें मूळ भाषण अिंग्रजी आहे आणि त्याचा मराठी अनुवाद सुगम आहे. तर्कतीर्थ जोशी, पु. य. देशपांडे यांची क्लिष्टतेची परंपरा मोडल्याबद्दल डांगे यांचें अभिनंदन केलें पाहिजे. तथापि विविध क्षेत्रांतून पुरावे गोळा करून त्यांवरून निष्कर्ष मात्र अत्यंत अशास्त्रीय काढण्यांत रा. डांगे यांनी (मार्क्सवादी असून) मार्क्सवाद्यांनाहि मागे टाकलें आहे. त्यांच्या भाषणांतील यच्चयावत् अशास्त्रीय विधानांचा परामर्श घ्यायचा म्हटल्यास स्वतंत्र लेख लिहावा लागेल. तथापि सामान्य जनांची दिशाभूल होअूं नये म्हणून त्यांच्या भाषणांतील अेक दोन नमुने तरी दाखविणें जरूर आहे.

लो. टिळकांनी राजकीय जागृति करण्यांसाठी जी सरस निबंधपद्धति काढली ती पुढे कुणींच चालविली नाही असें सांगून पुढे कम्युनिस्टांनी त्या अुज्ज्वल परंपरेचें पुनरुज्जीवन केल्याची ग्वाही डांग्यांनी दिली आहे. अलीकडे लोककवि म्हणून साठे नामक कोणा लोकोत्तर शाहीराचें नांव त्यांनी सांगितलें ! त्याप्रमाणे लोकमान्यांचे तेजस्वी वाङ्मयीन वारस कोण यांचींहि नांवें त्यांनी दिलीं असतीं तर बरें झालें असतें. सामाजिक संघर्षाचें अुत्कृष्ट चित्रण म्हणून मागे अेक कम्युनिस्ट समीक्षकांनी 'देवदास' या शरद्‌बाबूंच्या कृतीकडे बोट दाखविलें होतें ! याच समीक्षकांनी ज्ञानेश्वर-तुकारामांना प्रतिकारक ठरविलें होतें. पण डांगे 'देवदास'चा अुल्लेखहि करीत नाहीत आणि ज्ञानेश्वर-तुकारामांनी आम जनतेच्या आशा-आकांक्षांना वाट फोडली अशी मोठ्या गौरवाची भाषा वापरतात. डांग्यांनी या विषयाचें विवरण अुत्तम केलें आहे. पण वर अुल्लेखिलेले कम्युनिस्ट समीक्षक व डांगे यांच्या मनांतली तफावत पाहतां दोन वस्तुनिष्ठ समीक्षकांची वाङ्मयीन कसोटी देखील अगदी परस्परभिन्न निर्णय देअूं शकते असें सिद्ध होत नाही काय ?

मुंबअी व अुपनगर साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत प्रा. रा. श्री. जोग यांनी साहित्यिकांच्या स्वातंत्र्याची जी कैफियत घडाडीने मांडली तीबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे. समाजाच्या विधिमंडळांत साहित्यिकांनी अधिकारस्वीकार केला तर त्यांच्या

प्रतिमेला व स्वातंत्र्याला पायबंद बसेल म्हणून विरोधी पक्षाची भूमिका साहित्यिकांनी कायम स्वीकारावी हें प्रा. जोगांचें म्हणणें पंथवेडाने न झपाटलेल्या कुठल्याहि कलावंताला पटेल. समाजाच्या विवेकबुद्धीचा आविष्कार हा जर वाङ्मयाचा हेतु धरला तर त्या विवेकबुद्धीवर नियंत्रण म्हणजे पर्यायाने समाजाची वाढ खुंटण्याची तरतूद नाही काय ? नियतीच्या विचित्र लीलांचें चित्रण करून मानवी जीवन ही अनेक दृश्यादृश्य शक्तींची कशी क्रीडाभूमि आहे हें दाखविणें साहित्यिकांचें प्रधान कर्तव्य प्रा. जोग मानतात. हं अतिशय खरें आहे.. प्रा. जोगां-सारखा व्युत्पन्न समीक्षक केवळ रंजन अेवढाच साहित्याचा हेतु आहे असें जेव्हा सांगतो तेव्हा त्या रंजनांत अुद्बोधन अध्याहृत असतेंच, आणि साहित्यिकाला तत्त्वज्ञान्याच्या जरा खाली खुर्ची द्यावी असें प्रा. जोग म्हणतात तेव्हा कोणी तसाच लोकोत्तर पुरुष दोनहि आसनांचा अधिकारी होअूं शकेल हें त्यांना संमत नाही असें वाटत नाही. असो. पुरोगामित्वाचीं कांही ठरीव रूक्ष-सूत्रें अुलगडून व त्यांतून बाहेर पडून शुद्ध साहित्याच्या रहस्याचें व अवतारकार्याचें निर्भीड विवेचन प्रो. जोग यांनी केलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करतांना, ठरीव नामवंत लेखकांच्या नांवांना (टीकेकरिता का होअीना पण) स्पर्शून चोरटी लाचारी दाखविण्याची परंपराहि त्यांनी मोडली याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावेसे वाटतात.

---

# वार्षिक साहित्यसमालोचन

## काव्य

काव्यपुस्तकांसंबंधी यंदा घेतला जाणारा आढावा फार आशादायक आहे यांत शंका नाही. त्यांत जुन्या गतकवींचे संग्रह आढळतील, विद्यमान प्रतिभावंतांचीं पुस्तकें दिसतील, आणि नवोदित कवींनी आपलीं काव्यपुष्पें समर्पिलेलीं सांपडतील. संपादन, संकलन, अनुवाद, नवानिर्मिति अित्यादि सर्व खातीं मरमराटीला आलीं आहेत. खंडकाव्यांपासून कणिकांपर्यंत सर्वांनी हजेरी दिली आहे. 'महाराष्ट्र कविपरंपरा खंड न पडला तिला जरा' हें B०० कवींचें वचन कवि खरें करून दाखविणार हें स्पष्ट दिसतें. आता 'अुणीव रसिकांचीच खरी आज मासते खरोखरी' हें त्याच कविश्रेष्ठांचें वचन खोटें करून दाखविण्याची जबाबदारी रसिकां-वर आहे.

यंदा स्वातंत्र्यवीर डॉ. सावरकर यांच्या षष्ठ्यब्दपूर्तीचा योग साधून त्यांची कविता संकलित करून प्रकाशित केल्याबद्दल प्रकाशक ढवळे व संपादक प्रो. मायदेव यांचें मनःपूर्वक अभिनंदन करावेंसें वाटतें. या संग्रहांतील कांही कविता प्रासंगिक व सामान्य आहे. स्वातंत्र्य-वीरांच्या व्यक्तित्वाचा वशिला मिळाल्यानेच तिला या संग्रहांत स्थान मिळालें. तथापि 'बाजी-प्रभूचा पोवाडा', 'जगन्नाथाचा रथोत्सव', 'फुलबाग', 'सागरास', 'अज्ञेयाचें रुद्ध द्वार' अित्यादि सुरस व अुदात्तरम्य कविता अेकत्र वाचायला मिळाल्याने आल्हाद होतो. सावर-करांच्या भाषेंत संस्कृतचा थाट बराच आहे, क्वचित् ती बोजड व जुन्या वळणाची वाटते. शब्दसंग्रह व वृत्तें यांचेंहि स्वरूप जुनेंच आहे. पण त्यांत प्रकट होणारी कळकळ, ओज व कलात्मक अहंकार फार हृद्य वाटतो. हिंदु धर्म व संस्कृति यांच्या प्राचीन वैभवाचीं स्वप्नें

त्यांना केव्हापासून पडत होती आणि हिंदुत्वाच्या पुनरुद्धाराचें तत्त्वज्ञान त्यांच्या मनांत केव्हा-पासून घोळत होतें याचा प्रत्यय येतो.

या कवितासंग्रहाचे प्रस्तावनाकार प्रा. मायदेव यांनी स्वदेशाभिमानविषयक जो प्रपंच केला तो मात्र चिंत्य वाटतो. विश्वबंधुत्वाचा आणि स्वदेशाभिमानाचा त्यांना वाटतो तसा विरोध असण्याचें कारण नाही.

स्वदेशाभिमानाचें हें विशाल आवाहन 'निर्वासित चिनी मुलास' या कविवर्य अनिलां-च्या काव्यांत अुत्कृष्टपणें प्रत्ययाला येतें. त्या चिनी बालकाची करुण कहाणी अैकून केवळ अश्रु ढाळायला अनिल लावीत नाहीत, तर अशी दुर्दशा व्हायला काय कारण झालें याचें सावेश व शास्त्रशुद्ध विवेचन त्यांनी केलें आहे. चीनच्या अवकळेला कारण झालेल्या स्वार्थी पुंजीपतींना, नादान सम्राटांना, साम्राज्यवादी देशी-विदेशी मुत्सद्यांना सडकून छेडून विषमतेवर आधारलेल्या समाजव्यवस्थेचें वैफल्य व क्रूरत्व त्यांनी जगापुढे मांडलें आहे आणि नव्या सुंदर जगाचें चित्रहि रेखाटलें आहे. अितक्या अुदात्त व घवघवीत काव्याची बांधणी मुक्तछंदाच्या बेंगरूळ पद्धतीने झाली अेवढीच खंत वाटते. अेरव्ही काव्याच्या लावण्याला तोड नाही.

'विसर्जन' हें रा. वि. म. कुलकर्णी यांचें पुस्तक वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रस्तावनाकार प्रो. जोग यांनी 'प्रेमभावने'चें थोडक्यांत पण मार्मिक विवेचन केलें आहे. प्रेमभावना आत्मनिष्ठ असते आणि तिला नसत्याचे जागीं असतें दिसूं लागतें हें खरें असलें तरी, **'हीतें वेड म्हणा खुशाल परि ती न्यारी तिची माधुरी'** हे कवि माधव जूलियन् यांचे अुद्गार कांही खोटे नाहीत. रा. कुलकर्णी यांच्या प्रस्तुत काव्यांतला विरही नायक आपल्या मीलनकालांतल्या रम्य क्षणांची आठ-वण करीत आहे. 'स्मृतिभूतां'ची संगतहि त्याला प्रिय होते. भृंगावर्तनी जातींत सुंदर शब्दांच्या साह्याने व्यक्त केलेल्या या विरहवेदना रसिकांना मोहून टाकतील यांत शंका नाही. या धर्तीचेंच म्हणजे प्रणयप्रधान असें श्री. ना. ग. जोशी यांचें 'जीवनयोग' हें काव्य आत्मनिष्ठेंतून समाज-निष्ठेंत रसिकांना नेणारें आहे. यांत वृत्तवैचित्र्य आहे. पांडित्य आहे. संदेशहि आहे. आचार्य भागवत यांची सुविस्तृत प्रस्तावना हें या काव्यग्रंथाचें अेक मनोहर भूषण आहे.

स्वातंत्र्यवीरांप्रमाणे आणखी कांही प्रसिद्ध कवींची कविता संगृहीत करण्याचे दोन तीन अभिनंदनीय प्रयत्न झाले आहेत. समर्थांच्या प्रभावळींतले केशवस्वामी यांची कविता वाचायची सोय रा. खर्शीकरांच्या श्रमांमुळे आता झाली आहे. आधुनिक मराठी कवितेंत 'आनंदी आनंद' अुडवून देणारे बालकवि ठोमरे यांचीहि समग्र कविता आता आपणांस पुस्तकरूपाने प्रो. पाटणकर देते झाले आहेत. या काव्यसंग्रहाच्या संपादनांत प्रो. पाटणकर यांनी घेतली त्याहून अधिक दक्षता घेतली असती तर काव्याभ्यासकांना फारसें ठेचाळावें लागलें नसतें.

गुलाबराव महाराजांचीं प्रेमळ पदें अेकत्र करून हनुमान् प्रेसने भाविक वाचकांवर अुपकार करून ठेविले आहेत. गुलाबराव महाराज ही निसर्गाची अेक मोठी चमत्कृति होती. ह्या प्रतिभासंपन्न मधुरभाववादी संताचें माहात्म्य महाराष्ट्राला अद्यापि खूप कळायला हवें. प्लेटो-प्लॉटीनसपासून शंकर-रामानुजांपर्यंत जगांतल्या श्रेष्ठ दार्शनिकांचें ज्ञान या संतवर्याने अंध असतां कसें मिळविलें हें गूढ आहे. भक्ति, ज्ञान आणि वैराग्य यांचा हा श्रेष्ठ आदर्श आधुनिक काळांत अुत्पन्न झाला. असो. या संत कवींचीं पदें अेकत्रित केलीं गेलीं हें अुत्तम झालें.

बालगीताच्या विभागांत राजकवि यशवंत यांच्या 'मोतीबागे'ने अुत्कृष्ट मर टाकली आहे. बालवाङ्मय हा अल्पशिक्षित शिक्षकांचा किंवा मेहनती 'बालबोध'कारांचा धंदा आहे अशी वृत्ति जाअूं लागली ही आनंदाची गोष्ट आहे. प्रौढ वाङ्मयांत प्रतिभासंपन्न म्हणून जे गाजले आहेत त्यांनाहि बालवाङ्मयांत महत्त्वाकांक्षेला क्षेत्र सांपडेल. कुठलाहि प्रतिभाशाली प्रौढ लेखक वा कवि बालवाङ्मयांत फड जिंकीलच असें नाही; म्हणजे बुद्धीचें व प्रतिभेचें कांही स्वतंत्र सामर्थ्यच या कामीं लागतें. असो. यशवंतांना सहस्र धन्यवाद देअूं या. दत्त, तांबे, माधव जूलियन् अित्यादि सत्कवींची परंपरा या क्षेत्रांत पुढे चालणार हें निश्चित झालें. या वेळीं रवीन्द्रनाथांच्या 'शिशू'चा मराठींत अवतार झाला हें सानंद नमूद करावेंसें वाटतें. आपल्या कविसम्राटांना साक्षात्कारवादी कवि व तत्त्वज्ञ म्हणून जग ओळखीत असलें तरी मुलांच्या अंतरंगीं शिरण्याची त्यांची शक्ति तितकीच प्रभावी होती हें पुष्कळदा आपण विसरतों. रा. ब. कारखानीस यांनी रवींद्रांच्या शिशुगीतांना मराठी पेहेराव चढविला हें ठीक केलें.

'विराट मानव' हें मराठवाड्यांतील डॉ. पुरवार याचें दीर्घ काव्य अत्यंत विचारप्रवर्तक आहे. या चिंतनात्मक काव्यांत मानवजातीचा निसर्गाशीं चाललेला झगडा, आशा-आकांक्षा यांचें चित्रण केलें आहे. कवि शांतिवादी (pacifist) आहे. पण शांतिवादाच्या आड येणाऱ्या संहारक शक्तींचें यथार्थ स्वरूप जाणण्याअितका तो वास्तववादी आहे. समता, त्याग व प्रेमभाव यांच्या साह्याने नवसृष्टि अुभारण्याची हिंमत कवीने बांधली आहे.

युगें युगें जी विराट शक्ती विस्कळीत झाली
त्यांच्या सजलों संघटनेला या झेंड्याखालीं।

अशी कवीची प्रतिज्ञा आहे. काव्य ओजस्वी आहे.

'तो आणि ती' या अुपहासगर्भ काव्याने प्रसिद्धीस आलेले रा. शं. गो. साठे यांनी 'शिलंगण' हें सुरस काव्य रचलें आहे. चंद्रकलेसारखी धावती जाति आणि साधें पण हृदयस्पर्शी चित्रण यांमुळे हें काव्य आपण आवडीने वाचत जातों. महाराष्ट्राच्या जानपदाचें सौंदर्य 'काय हो चमत्कार!' नंतर याच काव्यांत विशेष रम्यपणें चित्रित केलेलें आढळेल. 'माअू' व त्यांचें कुटुंब आपलेच कोणी ऋणानुबंधी असावेत असें वाटतें.

'जगाचा अितिहास' अल्प वयांत विरचून प्रसिद्धीस आलेले श्री. रा. ना. नातू यांनी आपल्या स्फुट कवितांचा संग्रह 'पाअूलवाट' म्हणून प्रसिद्ध केला आहे. भूतकाळच्या गहन अरण्यांत शिरणारी त्यांची जिज्ञासाशक्ति दृश्य जगाच्या सीमेवर जाअून 'करिं अज्ञाताचें दार खुलें' असें म्हणतांना दिसते. या कवितांतली कोवळीक व आशावाद स्पृहणीय आहे. 'जासवंदीचीं फुलें' (चौधरी व जगताप), 'कुंदकळ्या' (सुरेश), 'किशोरगीतें' (मा. गो. जोशी) अित्यादि संग्रह अुल्लेखनीय आहेत. 'कणिका' या काव्यप्रकाराची विशेष आवड घेअून गोविंद झोकरकर यांनी कांही 'काव्यकणिका' महाराष्ट्रास सादर केल्या आहेत. त्यांतील बहुसंख्य कणिका रसिकांना चटकदार वाटतील.

युद्धजन्य परिस्थिति आणि काव्याबद्दलच्या प्रेमाला अेकंदरीने आलेली अवकळा यांचा विचार केला म्हणजें ही काव्यनिष्पत्ति स्पृहणीय नाही असें कोण म्हणेल? हें वार्षिक समालोचन संपवितांसंपवितांच दोन सुरस काव्यसंग्रह समोर येत आहेत. त्यांपैकी अेक मराठीचे विद्वान् समीक्षक रा. लाड यांचा 'मधुपर्क' हा आहे. दुसरा संग्रह महाराष्ट्रांतील नामवंत कवि गिरीश यांचा 'मानसमेघ' हा आहे. रा. लाडांनी आपल्या संग्रहाला जोडलेली विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना हें त्यांच्या काव्यग्रंथाचें मोठेंच लेणें होय. या संग्रहांची सुविस्तृत चर्चा यथाकाल होअील;

समालोचनाला आजतागायतपणा येण्यासाठी आणि वाचकांची अुत्सुकता वाढविण्यासाठी त्यांचा फक्त अुल्लेख तेवढा येथे केला. या समालोचनावरून मराठी कवितेचे चाहते आनंदित होतील आणि तिचें अशुभ भविष्य वर्तविणारे कुडमुडे ज्योतिषी ताळ्यावर येतील अशी खात्री वाटते. मधून मधून काव्यसंपदेला ओहोटी लागत असली तरी पुनः पुनः 'नवरसांचे सागर' आणि 'भावार्थांचे गिरिवर' निर्माण होतील यांत वाद नाही.

गो. ग. तळवलकर

## नाट्यवाङ्मय

मराठी नाटक पौराणिक, अैतिहासिक, काल्पनिक आणि सामाजिक अशा अवस्थांतून अुत्क्रांत झालेलें आहे. आजच्या नाटकांचा कल निश्चितपणें सामाजिकाकडे झुकलेला आहे. तरी सुद्धा मराठी नाटकांच्या या चारहि अवस्था प्रस्तुत कालखंडांत पाहावयास सांपडतात. याच कालखंडांत केवळ स्त्रियांसाठी लिहिलेलीं अशीं पुरुषपात्रविरहित दोन नाटकें आहेत; दोन अेकांकिकांचे संग्रह आहेत, आणि कांही अमोलिक रूपान्तरित नाटकांची भरहि मराठी नाट्यवाङ्मयांत पडलेली आहे.

या प्रकारवैचित्र्याबरोबरच बहुप्रवेशी नाटकापासून अेकांकी अेकप्रवेशी रचनेपर्यंत रचनावैचित्र्यहि येथे पाहावयास सांपडतें. अजूनहि सूत्रधार येअून नाटकाची स्थापना करून जात आहे, छत्रपति शिवाजीमहाराज आणि शाहूराजे आवेशयुक्त भाषणें करीत आहेत, आणि तुमच्याआमच्यासारखा पोशाख केलेलीं माणसें शक्यतों समजेल अशा भाषेंत केव्हा हास्यास्पद रीतीने, केव्हा विनोद करून, केव्हा यावच्छक्य गांभीर्याने महत्त्वाच्या सामाजिक प्रमेयांपासून तों अद्ययावत् 'रॅशनिंग'पर्यंत बहुतेक गोष्टींना स्पर्श करून जात आहेत. बहुतेकांचा कल धीरगंभीर किंवा चतुर गद्याकडे वळत असला तरी पुष्कळसे कमीअधिक प्रमाणांत ताना मारीत आहेत, आलाप घेत आहेत. मराठी नाटक आज कोणत्या दिशेने जात आहे हें अेवढ्याने सूचित झालें तरी, त्या दिशेची नीट कल्पना येण्याला या नाट्यवाङ्मयाची सूक्ष्म दृष्टीने छाननी करणें अुपकारकच ठरेल.

नेने यांचें 'श्रियाळचरित्र' (दुसरी आवृत्ति) आणि नाट्याचार्य खाडिलकर यांचें 'त्रिदंडी संन्यास' हीं नाटकें अर्थातच पौराणिक आहेत. पैकी 'श्रियाळचरित्र' हें पद्यप्रधान संस्कृत नाटकाचा तर्जुमा आहे. 'त्रिदंडी संन्यासा'ची रचनाहि जुन्या धर्तीची आहे. सुभद्रेच्या बाणाने द्वारकेभोवतीं सदा रक्षणार्थ फिरणारें सुदर्शनचक्र बंद पडून तिच्या धनुर्धारीत्वाचा जो बोलबाला होतो त्यामुळे ती डोअीजड वाटून गदाधारी दुर्योधनच काय परंतु कोणताहि वर तिला स्वीकारणार नाही, व त्यामुळे ती अविवाहित राहील, या भीतीने, व त्यांतच सुभद्रेच्या अर्जुननिष्ठेची व तिने आरंभिलेल्या अुपासाची भर पडल्यामुळे, वाटेल त्याच्याशीं— अर्जुनाशीं सुद्धां— तिचें लग्न लावण्याची बलरामाने दाखविलेली तयारी परिचित सौभद्रापेक्षा वेगळी व नवीन असली तरी मनाची पकड घेअूं शकत नाही. शिवाय 'सौभद्रां'तल्या सर्व विसंगत स्थलांची आठवण ठेवूनहि त्यांतलीं कृष्ण, रुक्मिणी, बलराम अित्यादि स्वभावचित्रें व त्यांतला तो हृद्य विनोद यांचा अभाव येथे जाणवल्यावांचून राहत नाही. या अुणीवेमुळे आणि— "बिलकुल हलायचें नाहीं--फार जड-फार जड—बिलकुल डोलायचें नाहीं—फार जड—बिलकुल डोलायचें नाहीं—फार जड—" (पान ३५) असल्या पुनरुक्त, शिथिल भाषापद्धतीचा अवलंब

बहुतेक सर्व प्रमुख पात्रांनी केलेला पाहिला म्हणजे वाटूं लागतें की हा सिंह आता म्हातारा झाला आहे.

मा. आ. कामत या बहुप्रसू लेखकाचें 'बंडाचें निशाण' व भालजी पेंढारकर यांचें 'अजिंक्य तारा' हीं दोन नाटकें अैतिहासिक आहेत. शिवाजीला पकडावयाला आलेला झुंजारराव घाटगे रायगडावर अेक दूत पिटाळून स्वस्थ बसतो, त्या दूताकडून कांहीहि काम झालें नाही हें जाणूनहि भवानराव पवाराच्या किल्ल्यांतच पोरींबाळींवर हात टाकण्यांत किंवा त्यांशीं अतिप्रसंग करण्यांत गुंगून जातो, किंवा फार तर भवानरावाला कैद करून प्रसंगीं ठार करूनहि किल्लाच बळकावूं पाहतो हें पाहिलें म्हणजे लेखकाला देवी भवानी...अतिप्रसंग... कैद...खून अित्यादि ठोकळेबाज गोष्टीच साधावयाच्या होत्या असें वाटतें. सुदैव अेवढेंच की 'बंडाच्या निशाणां'त तीं पल्लेदार भाषणें व दीर्घ स्वगतें लेखक लिहूं शकला नाही. त्या मानाने भालजींचें 'अजिंक्य तारा' नमुनेदारच म्हटलें पाहिजे. मधले दुवे गाळून नाटकाचा शेवट अेकदम झाल्यानें कल्पनेला ताण बसतो हें खरें; परंतु या नाटकांत विनोदाकरिता विनोद नाही; लांबलचक भाषणें वा स्वगतें फारशीं नाहीत; भाषेला तत्कालीनतेचा आभास अुत्पन्न करणारें वळण असूनहि दमछाक लांबण किंवा अनुप्रासांच्या बाराखड्या नाहीत; संवादांत जोरकसपणा आहे, सुटसुटीतपणा आहे; स्वभावचित्रांच्या रेषा ठसठशीत आहेत. या विशेषांनी या नाटकाला नेटकें स्वरूप आलें आहे.

दिवेकर-फाटक या लेखकद्वयाचें 'प्रेमसाम्राज्य' व ना. वा. पराडकर यांचें 'भूपति' हीं दोन्ही नाटकें काल्पनिक या सदरांतच जमा करावीं लागतील. दोन्ही नाटकांना संस्थानी वातावरणाची पार्श्वभूमि आहे. परंतु प्रेमसाम्राज्य अुघड अुघड काल्पनिक आहे, तर 'भूपती'ला आधुनिकाची स्पष्ट छटा आहे. 'प्रेमसाम्राज्या'ची रचना जुन्या घाटाची बहुप्रवेशी आहे, तर 'भूपति' अेकांकी अेकप्रवेशी आहे. वस्तुतः आठव्या अेडवर्डांच्या प्रेमसंबंधावर 'प्रेम-साम्राज्या'ची अुभारणी झालेली आहे. परंतु महामंत्र्याचा स्वार्थ आणि राणीचा सावत्रपणा या दोन प्रभावी घटनांवर नाटकाचा परिपोष झाला असल्याने रचनेला परिचित ठोकळेबाजपणा आला आहे. अितकेंच नव्हे तर, या घटनांमुळे जयंताच्या राज्यत्यागाला दरिद्री मुलीशीं असलेला प्रेमसंबंध कारणीभूत न होतां त्याचा राज्यत्याग निव्वळ नाटकी ठरतो. राज्य की प्रेयसी या त्याच्या मानसिक संगराला महत्त्व देण्याच्या अेवजी हा राज्यत्याग बाह्य गोष्टींवर अवलंबून ठेवल्याने नाटकाच्या परिणामकारकतेला बाध आल्याशिवाय राहिला नाही. 'भूपतीं'त मात्र पराडकरांनी वातावरणाची व तंत्राची आधुनिकता आणण्याचा यत्न केला आहे. स्वार्थी व मूर्ख पण सर्वसत्ताधारी दिवाण आणि राज्य सोडून युरोपांतच आयुष्य काढणारा राजा सत्यसृष्टींतील असण्याचाहि संभव आहे. संस्थानच्या परिसरांत वाढलेल्या— काँग्रेस, लोकशाही, कम्युनिझम्, महिलांची सामाजिक चळवळ अेतद्विषयक मतांच्या— प्रतिनिधींचीं चित्रें निश्चित मतप्रकटनाने स्पष्ट झालीं आहेत. राजाचें चित्र आदर्श काढण्याचा प्रयत्न केल्याची कबुली लेखकानेच दिली आहे. मात्र हा राजा लोकमताला मान देअून पेचप्रसंग सोडविण्यासाठी जी द्विविध तडजोड सुचवतो त्यांपैकी अेक— सर्वांना मतदान देअून निवडणुकीला राजा स्वतः अुभा राहतो ही— बर्नार्ड शॉनें 'अॅपल् कॉर्ट्'मध्ये अगोदरच सुचवली आहे; आणि तज्ज्ञांचें परकी कायदेमंडळ नेमून राज्यघटना ठरविण्याची जी दुसरी कल्पना तिचें आगामी काळांत काय होणार आहे याविषयी लेखकाप्रमाणेच सर्वांना संशय आहे. या नाटकासंबंधी बाअीट

अेवढेंच वाटतें की, यांत नाट्य किंवा नाट्यानुकूल प्रसंग नाहींत; परंतु संस्थानी राजकारणाकडे लक्ष वेधण्याचा प्रयत्न स्वागत करण्याजोगा आहे यांत शंका नाही.

रंगभूमीवरच्या जुन्या नाट्यप्रकारांतून आधुनिक सामाजिक नाटकांत अवतीर्ण होतांना अग्रभागीं जर कोणाचें नांव चमकत असेल तर तें वरेरकरांचें. रंगभूमीवर जुने मानकरी दिसत नाहींतसे झाले, किंवा त्यांनी 'संन्यास' घेतलेला असला, तरी वरेरकरांची लेखणी अजून पूर्वीच्याच दमाने रंगभूमीची सेवा करीत आहे ही गोष्ट वरेरकरांना जितकी भूपणावह आहे, तितकीच ती मराठी नाट्येतिहासाला महत्त्वाची आहे. प्रस्तुत कालखंडांत वरेरकरांचीं 'माझ्या कलेसाठी' व 'सारस्वत' हीं दोन नाटकें येतात. दोन्ही नाटकांत वरेरकरांनी अगदी नव्या विपयांना हात घातला आहे. दोहोंचे विपय कलावंताचें जीवन हेंच आहे. पैसा, कीर्ति व प्रेम यांचा मोह सोडून 'माझ्या कलेसाठी' जीवन व्यतीत करणाऱ्या नायकाचें चित्र रंगविण्याचा प्रयत्न वरेरकरांनी अेका नाटकांत केला आहे. या चित्राला अुठाव देण्यासाठीच बहुधा अेक चित्रकार नवरा व अेक चित्रकार बायको या नाटकांत घातलीं असावीं व त्यांच्या प्रापंचिक भानगडींतून कलेच्या ध्येयाला प्रपंच आड येतो असें सूचित करण्याचा यत्न केला असावा. अेका गब्याला विलायतचा 'डिप्लोमा' मिळालेला दाखवून तथाकथित कीर्तीला हास्यास्पद केलें असावें. परकीय मान्यतेच्या अभावीं अुपेक्षित झालेल्या व ती मान्यता लाभतांच अभिनंदित झालेल्या तरुण नायकाला रसिकतेची परप्रत्ययनेयता व कीर्तीचा तकलुपीपणा जाणवल्यामुळेच आपल्यामागे आलेल्या लक्षधीश तरुणीचें प्रेम त्याने लाथाडलें असावें. या नाटकांतल्या या घटनांची अशी संगति लावतां येत असली तरी कवि व नट या लाकडी पात्रांचे संबंध मूळ सूत्राशीं कोठेहि लावतां येत नाहींत. अितकेंच नव्हे तर नायकाच्या भोंवतीं बऱ्याचशा अनवश्यक पात्रांची प्रभावळ अुमी करण्याने नाट्यहेतु फारसा साध्य होण्याअेवजी तो लोपून गेल्यासारखें वाटतें. कारण वर वर पाहतां घरांत स्वतःची बहीण, अेका चित्रकार मित्राची बायको आणि अेक लक्षाधिशाची कन्या या तिघी असतांना व तिघी मिळून घरचा प्रपंच नेटका करीत असतांना या तरुण चित्रकाराचे ओले डोळे आणि अुसासे यांचा फारसा परिणामच होअूं शकत नाही. शिवाय ध्येयवादी कलावंताला लागणारा मनाचा कणखरपणा या नायकांत असण्याअेवजी जी अेक काव्यात्म, आर्त, अेकलेपणाची जाणीव त्यांत आहे ती त्यांच्या अेकटें राहण्याच्या निश्चयाविपयी साशंकता निर्माण केल्याशिवाय राहत नाही. सबंध नाटकांत कृतिमय किंवा मानसिकहि घटना फारशा न घडतां संवादाला जें चर्चामय स्वरूप आलें आहे त्यामुळेहि या नाटकाच्या नाट्यगुणाला बाध आला आहे. 'सारस्वत'मधील पहिली अेकांकिका 'चढती पायरी' अशीच अतिरंजित झाल्यामुळे किंचित् कमी प्रतीची वाटते. परंतु दुसरी अेकांकिका 'शिखरावरून' मात्र त्यांतल्या स्वभावलेखनं, सहृदयता, जिव्हाळा व कारुण्य या गुणांनी मराठी नाट्यवाङ्मयांत अेक अमोलिक कृति झाली आहे. खायची भ्रान्त झाली तरीहि 'मुके मिठ्यांचें' वाङ्मय लिहायला तयार नसलेल्या वृद्ध बाबासाहेबांचा ध्येयवाद सिंहाला साजणारा आहे. ध्येयवादी वाङ्मय खपत नाही म्हणून केरावारी दिशोब करणाऱ्या मराठी प्रकाशकांच्या व्यवहारांत वास्तवता, भांडवलदाही, आपमतलबीपणा आणि वाङ्मयमूल्याविपयीची निष्ठुर अुदासीनता यांचें प्रखर प्रतिबिंब पडलें आहे. आणि म्हाताऱ्याला सोडून जाणाऱ्या जावयाच्या वर्तनांत भीपण परिस्थितीची असहायताच व्यक्त झाली आहे. सर्व बाजूंनी कोंडमारा झालेले बाबासाहेब जरी 'शिखरावरून' खाली कोसळले असले तरी या अेकांकिकेने वरेरकर मात्र शिखरापर्यंत पोचले आहेत! या अेकांकिकेंतील वातावरण व

अनुक्रमणिका

मध्यवर्ती व्यक्ति खूप परिचित वाटल्याने त्यांना वैयक्तिक स्वरूप आलें आहे हा जरी यांत दोष आहे तरी 'शिखरावरून'मध्ये प्रकटलेल्या मानवतेने ही अेकांकिका चिरंतन स्वरूपाची ठरल्याशिवाय राहणार नाही; किंबहुना, या वर्षांतल्या नाट्यवाङ्मयांत श्रेष्ठ कलाकृति हीच ठरेल.

वर्तमानपत्री लेख, भाषणें, राजकीय चळवळी यांनी भरीव कामगिरी होत नाही; अमर कीर्ति मिळत नाही; म्हणून मार्क्सप्रमाणे अजरामर कीर्तीचा ग्रंथ लिहूं अिच्छिणारा व त्यांत शरीर शिणवून ग्रंथ अर्ध्यावर असतांना शरीररोगाला बळी पडलेला ध्येयनिष्ठ अनिरुद्ध, वरखेडकरांना 'ध्येयाचा ध्यास' या नाटकांत रंगवायचा होता असें मथळ्यावरून व अेकंदर अवसानावरून वाटतें. परंतु लेखकाचा रचनेचा पवित्रा चुकला असें म्हणावें लागतें. अगोदरच हळव्या मनाचा अनिरुद्ध, आजोबाच्या भुताच्या भीतीने झालेला आअीचा मृत्यु व स्वतःवर प्रेम करणाऱ्या शरयूचा झुरणीने झालेला अंत यांनी दुबळा होतो व संतापाने मृत्युमुखीं पडलेल्या पित्याच्या दुःखाने पुरा खचतो, त्याच वेळीं त्याचा ध्येयवाद म्हणजे ध्येयाचा ध्यास नसून मन व्यग्र ठेवून आंतरिक दुःखें गाडण्याचा केवळ प्रयत्न होय असेंच वाटतें. वस्तुतः यांतच नाट्यबीज आहे. आणि अनिरुद्ध क्षयी आहे हें दाखविण्यांत या घटनेवर त्याचा कुंदेशीं असलेला प्रेमसंबंध फिरवून दुसरें नाट्यबीज फुलवितां आलें असतें; परंतु लेखकाच्या अननुभवाने या दोन्ही नाट्यबीजांचा त्याला अुपयोग करून घेतां आला नाही.

मो. ग. रांगणेकर यांच्या 'नंदनवन' या नाटकांत वर वर पाहतांना द्विपत्नीकत्वाचा आधुनिक सामाजिक प्रश्न डोकावल्यासारखा वाटतो. त्यांच्या 'कुलवधू'पेक्षा या नाटकांत प्रमेयाची छाया आधिक्याने व बऱ्याच नेटकेपणाने पडली आहे यांत शंका नाही. अेका दृष्टीने 'कुलवधूं'त सामाजिक प्रश्न आहे असें म्हणणेंहि चुकीचें ठरेल. कारण भानुमती परिस्थितीने नटी बनली आहे, आणि नटी बनूनहि ती निगर्वी आहे, हें खरें मानलें तरी तिचा सासूसासऱ्यांना खूष ठेवण्याचा प्रयत्न निव्वळ 'अॅक्टिंग' आहे हें बोंचल्यावांचून राहत नाही. नवऱ्याचा अहंकार सर्व बाजूंनी स्पष्टपणें दुखावला जात असतांना त्याच्यावर मत्सराचा आरोप करण्याला व अिब्सेनच्या नोराच्या अैटीने घरांतून निघून जाण्याला तिला कांहीच कारण नाही. आणि जाअून जाअून तिच्या तत्कालीन चांगुलपणाने दिपलेल्या सासूसासऱ्याकडे जाण्याने तिला काय माणुसकी लाभणार आहे? माणुसकीचा शोध अफाट जगांत लागत असतो; पतित्यागांत तिचें कुलवधूत्व कुठे राहिलें? का जगाचा आसरा शोधण्याअैवजी सासूसासरा यांचें घर गांठण्यांत ती आपला कुलवधूपणा व्यक्त करते आहे? अेका सामाजिक प्रश्नाची जी गफलत 'कुलवधूं'त झाली आहे ती मात्र 'नंदनवनां'त रांगणेकरांनी टाळली आहे. या नाटकाचें स्वरूप त्यांनी शेवटपर्यंत गंभीर ठेवलें आहे. तरीसुद्धा या नाटकांत सामाजिक प्रमेयाचा परिपोष होअूं शकत नाही. त्याचें कारण या नाटकाला आलेली वैयक्तिकता. अुद्धवाची पत्नी मनोरमा ही अशोकाची विवाहपूर्व प्रेयसी असणें व अुद्धव पत्नीच्या पेटींत सांपडलेल्या प्रेमपत्रांनी चिडून जिच्याशीं दुसरें लग्न करायला निघतो ती अवंतिका अशोकाच्या विकारवशतेमुळे त्याला सोडून गेलेली त्याची पत्नी निघणें या घटनांनी कथानकाला बांधेसूदपणा निश्चित येत असला तरी त्यामुळे हा चार व्यक्तींतलाच प्रश्न ठरतो यांतून सर्वग्राहकतेचीं बीजें फुलविणें लेखकाला जमलें नाही. मात्र अेक गोष्ट कबूल केली पाहिजे की रांगणेकरांच्या नाटकांत 'नंदनवन' हेंच नाटक पैशाच्या दृष्टीने पडलें असलें तरी नाट्यगुणांनी सर्वांत चांगलें आहे. 'कन्यादान' ह्या त्यांच्या चवथ्या नाटकांत रांगणेकर पुन्हा तथाकथित लोकप्रियतेकडे वळले असल्याचें स्पष्ट दिसतें. 'बेफाम विनोदी' म्हणून या

नाटकाचा बोलबाला करण्यांत येत आहे. रांगणेकरांचा विनोद सहज ओघांत येणारा व खुसखुशीत आहे हें खरें परंतु 'कन्यादानां'त विनोदहि फारसा नाही व त्या विनोदांत किंवा सर्व नाटकांत बेफामपणा काडीमात्र नाही. घरजांवयाच्या बंदिस्त जीवनांतील अुद्वेगावर हें नाटक आधारलें आहे. पहिल्या अंकांतील मार्गवाचा अुद्वेग व सासऱ्याचें घर सोडून जाण्याचा निश्चय मोठें औत्सुक्य अुत्पन्न करतात. घनःश्यामाचा पत्नीवर अवलंबून राहण्याचा अैतखाअूपणा विरोधानें भार्गवाच्या चित्राला अुठाव देतो. परंतु नवऱ्याच्या निष्क्रियतेने कंटाळून आवेशानें आलेली अहिल्या घनःश्यामाने नोकरी धरली हें कळतांच जेव्हा पुन्हा त्याच्याबरोबर परत जाते आणि मार्गवहि स्वतंत्र बिऱ्हाड थाटायला बाहेर पडतो त्याच वेळीं— दुसऱ्या अंकांत— नाटक खलास होतें. वास्तविक या दोन्ही अंकांतहि नाट्यगुणांचा फारसा परिपोष झालेला नाही; परंतु तिसऱ्या अंकांतल्या आबा-लक्ष्मी या जोडप्याच्या पुत्रीप्रेमाचें व माणिकच्या मूर्ख मातृ-पितृप्रेमाचें जें पुनरुक्त चर्वितचर्वण आलें आहे तें निःसंशय कंटाळवाणें आहे. लाडांत वाढलेली माणिक चांगलें लग्न होअून पतिसहवास अनुभवूनहि, आअीबापांना सोडायला शेवटपर्यंत जरा नाखूपच आहे, आणि तिचे आअीबाप अेकहि मुलगी घरांत नसल्याने करमणार नाही म्हणून तिला सोडायला तयार नाहीत, हाच या नाटकांतला बेफाम विनोद असावा! कारण माणिकचे आअीबाप कदाचित् मूर्ख असले तरी माणिक मात्र अक्षरशः गाढव असली पाहिजे, नाही तर कमालीची अवास्तव असली पाहिजे, त्याशिवाय तिच्या व्यक्तिचित्रणाचा बोध होण्यासारखा नाही.

अेक पत्नी असतांना दुसरी करण्याच्या प्रश्नाने बऱ्याच लेखकांना सतावलें आहे. 'अुडतीं पांखरें' या नाटकांत हाच प्रश्न वरेरकरांनी कलात्मक रीतीने मांडला होता. गं. वि. गोखले यांच्या 'नवें राज्य' या नाटकांत हाच प्रश्न अेका साहित्यिकाच्या जीवनांतून मांडण्याचा अुद्देश असावा असें दिसतें. परंतु सामाजिक प्रमेय पुढे मांडण्यापेक्षा आधुनिक साहित्य व साहित्यिक, तरुण मुलें व मुली आणि आधुनिक समाजजीवन अित्यादींना टिंगलखोरपणाने चावे घेण्यापलीकडे या नाटकांत कांहीच आढळत नाही आधुनिक सामाजिक जीवनांतले दोष विचारवंतांना दिसल्यावांचून राहणार नाहीत, परंतु बन्सी-बांसरीसारख्या खेडवळ अशिक्षितांचा आणि सहदेव-भाडळीचा आदर्श पुढे धरणाऱ्या लेखकाची ही टीका म्हणजे बुरसट व मत्सरी आग आहे. सामाजिक प्रश्नांना वगल देअून किंवा चर्चाविषयक व्यक्तींवर तोंडसुख घेअून प्रमेयें सुटत नसतात याची दखल लेखकाला नसावी. सबंध नाटकांतल्या अर्वाच्य भाषणांतून 'नवें राज्य' म्हणजे काय याचा पत्ता लागणें कठिण आहे. आणि म्हाताऱ्या साहित्यिकावर भाळलेल्या कलेच्या कृत्रिम, नाटकी हृदयपालटाने हें तथाकथित 'नवें राज्य' कोसळून पडण्याचाहि संभव नाही. या नाटकांतलें कोणतेंहि पात्र कुठे व कां प्रवेश करतें, जातें, याला कांहीच ताळतंत्र नाही. प्रत्येकाच्या तोंडचीं भाषणें अशीं आहेत की त्यांची अुलटापालट केली तरी व्यक्तिचित्रणाला— असल्यास— धोका पोंचण्याची बिलकुल धास्ती नाही. याला नाटक कां म्हणावें तेंच कळत नाही! कारण हें नाटक म्हणजे वाटेल त्या विषयावरील संवादांचें अेक गाठोडें आहे.

अशीच प्रमेयसिद्धीची गफलत कामत यांच्या 'तीन तासांत' या नाटकांत झाली आहे. शर्यतीच्या व्यसनाचा 'बंदा गुलाम' बनलेल्या अुल्हासचें व रमेशचें चित्र रंगविण्याचा प्रयत्न करतांना अुल्हासचें रेसला जाण्याची तयारी करणें व रमेशचे सर्व पैसे बुडणें या दोन गोष्टींशिवाय या नाटकांत लेखकाने कांहीच दाखविलें नाही. पहिल्या दोन अंकांत कथानकाशीं

सुतराम् संबंध नसलेली अशी डॉक्टर-रोग-रोगी याविषयी भयंकर कंटाळवाणी बडबड आहे. कलेचा आजार इतका खोटा आहे की तिला तो कृत्रिम नाट्याने आपल्या हालचालींत किंवा भाषणांतहि दाखवतां आला नाही. या आजाराने रेस चुकवून शुल्हास घरीं राहतो! परंतु अशा रेस चुकवण्याने किंवा रमेशचे पैसे बुडल्यामुळे व चोरीचा आरोप येऊन बेअब्रू होण्याच्या भीतीने शर्यतीचें व्यसन सुटूं शकतें असें लेखकाला म्हणावयाचें आहे की काय? लेखकाने निदान कमतनूरकरांचें 'श्री' नाटक तरी डोळ्यांसमोर ठेवायला हवें होतें.

र. वि. सरमळकर यांच्या 'कलाकौस्तुभ' या नाटकांत एका समाजवंचकाचें चित्र रंगविण्याचा प्रयत्न आहे. परंतु आपल्या मोहकपणाने, श्रीमंती ऐश्वर्याने, वक्तृत्वाने समाज-सेवेच्या नांवाखाली कीर्तीची पैदास करणारा आणि आपल्या पाशवी वासनांची पूर्ति करणारा कौस्तुभ नाटकांत तसा दिसता तर फार बरें होतें. त्यामुळे निरुपमा, ज्योति व कला या मुली त्याला कां बळी पडल्या हें समजलें तरी असतें! नाटकाच्या शेवटीं वर्णिलेला कलेवरचा बलात्कार, कलेची ॲसिड पिऊन आत्महत्या, क्लोरोफॉर्मच्या रुमालाचा आणि कलेने मरतां मरतां लिहून ठेवलेल्या कबुलीजबाबाचा पुरावा अित्यादि गोष्टींनी या नाटकाला अेखाद्या 'चार आणे माले'चें स्वरूप आलें आहे. पात्रांच्या स्वभावचित्रणांत विसंगति आहे, आणि "प्रणयिनीच्या प्रीतीचीं सुगंधी सुमनें जिवाच्या जतनेनें जपून ठेवणारा मजसारखा रसिकच असतो" (पान १७) अशा बाराखडींत 'कल्पनाविलास' नसून गतानुगतिकताच आहे.

केवळ स्त्रियांसाठी लिहिलेल्या ना. धों. ताम्हनकर यांच्या 'विदुषी'त विदुषींच्या पोषाखांचें, फॅशन्सचें व बोलण्याचें मूर्ख अनुकरण करणाऱ्या अर्धशिक्षित वल्लरीचें चित्र आहे. या नाटकांत सूक्ष्मपणें आलेली आधुनिक स्त्रियांची टिंगल व जुन्या स्त्रियांचा आदर्श यांच्या-द्वारें विनोद व बोध लेखकाला साधावयाचा आहे. ताम्हनकरांच्या नाटकाचा सांचा ठरून गेल्यासारखा आहे. बोध देण्यासाठी केलेला विनोद व स्वभावाचें अतिरंजन पूर्वपरिचित आहे. त्या मानाने सौ. आनंदीबाई किर्लोस्करांच्या 'नव्या दाटा' स्वागतार्ह आहेत. जोडीदार निवडण्याचें स्वातंत्र्य, परिचय मंडळाची कल्पना व घटस्फोट यां गोष्टींचा पुरस्कार करतांना त्यांनी नाट्यसमज अधिक दाखवला आहे. या नाटकांत वास्तवता आहे; प्रसंग खूप घडतात; त्यामुळे गति आहे व तत्त्वप्रतिपादनाची मर्यादा संभाळल्यामुळे व्याख्यानबाजी कुठे आलेली नाही. मात्र चंद्रा व म्हाळसा यांचा हृदयपालट बराचसा नाटकी आहे, आणि सुरेशच्या आगमनाची सूचना आकस्मिक आहे. परंतु त्यावरून लेखिकेला ही सुखान्तिका करावयाची होती अेवढेंच दिसतें.

प्रचारार्थ लिहूनहि कलेचा संयम साधण्याचें यश त्र्यं. शं. वकील यांच्या 'जळतीं घरें' या पांच अेकांकिकांच्या संग्रहाने निःसंशय मिळवलें आहे; यांतल्या सर्वच अेकांकिका अेकजात चांगल्या नसल्या तरी त्या सर्वांचें जग वेगळें आहे. दारूने होणाऱ्या हालांचीं, कुटुंबनाशाचीं हृदयस्पर्शी चित्रें यांतून रंगवलीं आहेत. हीं चित्रें समाजांतल्या खालच्या थरांतलीं आहेत. त्यांत जिवंतपणा आहे, वास्तवता आहे; कारुण्य आहे. विशेषतः 'तिला जगायचं होतं' ही शेवटची अेकच अेकांकिका करुणसुंदर आहे. दारूच्या धुंदींत बापानेच बिरी फेडल्यावर सर्वनाशाने अधःपतित झालेली, जीवनमृत जीवनाला दारूच्या नशेंत तगवूं पाहणारी आणि व्यसनांत, पापांत पांगळ्या बहिणीला न विसरणारी, स्वतःच्या कलंकित जीवनाची छाया केशवावर पडूं नये म्हणून गळ-फांस घेणारी राधा डोळे ओले केल्याशिवाय राहणार नाही. तिच्यांत अमोघ मानवता आहे;

सुटसुटीत संवाद आणि मधून मधून वऱ्हाडी बोलीचे शब्दप्रयोग यांनी या संग्रहाला अशीच वास्तवता आणली आहे. जॉबरच्या हुकुमशाहींत दडपलेल्या गिरणीकामगारांच्या जीवनाचें चित्रण करणारें तु. कृ. सरमळकरकृत 'दादा' हें लघुनाटक त्यांतल्या विषयामुळे व जवळ जवळ त्या कामगारांतच वावरणाऱ्या लेखकामुळे असेंच स्वागतार्ह मानावयास हवें.

आतापर्यंत पाहिलेल्या सामाजिक नाटकांचें स्वरूप गंभीर असें होतें परंतु सामाजिक विषय घेऊन केवळ करमणुकीच्या उद्देशानें लिहिलेल्या नाटकांची संख्याहि कांहीं कमी नाहीं. प्रसिद्ध लेखक ना. वि. कुलकर्णी यांचें 'नवीन कल्पना' हें नाटक या प्रकारांतलें. मालकाचा नोकर व नोकराचा मालक होणें ही यांतली प्रमुख घटना आहे. प्रसंगोपात्त नवीन आणि कल्पना या पात्रांच्या लग्नाला आलेल्या गैरसमजाच्या विघ्नाचा निरासहि यांत आला आहे. यांत प्रसंगनिष्ठ विनोद आहे; तसा शाब्दिकहि आहे. आणि वल्गनेच्या मापणांत तर त्याला तमाशेवजा स्वरूपहि येऊन जातें. नाटकांत नवीन, कल्पना हीं पात्रें, व जवळ जवळ तितकाच महत्त्वाचा असणारा टेलिफोन, हीं आधुनिक असलीं तरी सैंपाकिण वल्गना व गडी सुपीक यांचा प्रणय, आणि छानदारकाका व ज्ञानेश्वरपंत हीं पात्रें रंगभूमीवरचीं जुनींच आहेत. नाटकाचें तंत्र मात्र आधुनिक आहे.

अ. ह. गद्रे यांच्या 'पाहुणा' या नाटकांत विषय लग्नाचाच आहे; फक्त शेवटीं नोंदणी-विवाहाचा फार्स आणून आधुनिकता आणलेली दिसते. हें नाटक सर्व दृष्टींनी गचाळ आहे. कथानकांत औत्सुक्य कोठेच नाहीं. पुढील घटना अगोदरच स्वच्छ दिसतात. रचनेंत ढिसूळपणा आहे, पात्रांत विसंगति आहे, निर्जीवपणा आहे. संवादांत कोठेहि जोम नाहीं. आणि "अरे हट् मंगब्या–" असल्या खुळचट वाक्याच्या कंटाळवाण्या पुनरुक्तीनें काय विनोद साधतो हें या नाटकांतल्या अेकूणअेक पात्रांच्या तोंडीं असणारा परमेश्वर जाणे !

त्या दृष्टीनें शकुंतला परांजपे यांच्या 'संगीत पांघरलेली कातडी' या नाटकांत फ्रेंच सुखात्मिकांची आठवण करून देणाऱ्या घटना आहेत. यांतली शरद् व मेघदूत ही राजकुमार व चित्रकार यांची जोडी 'चढाओढ'मधल्या वसंत-माधवसारखी आहे. या नाटकांत रचना अशी कुठे दिसत नसली तरी प्रसंग गंमतीनें घडत जातात. संवादांत खटका आहे, सूक्ष्म विनोद आहे, बोलमापेची रंगत आहे. स्वभावचित्र म्हणून तुळसा कोळीण छान आहे. मात्र हें नाटक लिहितांना प्रयोगदृष्ट्या लेखिकेला रंगभूमीचा पार विसर पडलेला दिसतो. कारण पहिला अंक धावत्या गाडींतल्या डब्यांत घडतो ! आणि अेका प्रवेशाची सुरवात अेका स्त्रीच्या शीर्षासनाच्या वा सर्वांगासनाच्या दृश्यानें होते ! परंतु या वास्तवतेचा मीपण कळस लेखिकेनें संवादांत केला आहे. पुरुषपात्रें व स्त्रीपात्रें दोघेंहि ग्राम्य मापा बोलण्यांत तरबेज आहेत.

'पेल्यांतील वादळ' हें नामतः बाबुराव गोखल्यांचें, पण वस्तुतः के. नारायण काळे यांचें, नाटक (प्रस्तावना पाहा) अुथळ सुखात्मिकेच्या स्वरूपाचें आहे. नवविवाहित आधुनिक जोडप्याच्या फुसक्या भांडणांतून अुत्पन्न होणारें हें वादळ मुळांतच इतकें पोकळ आहे की त्याची दुसऱ्या व तिसऱ्या अंकांतली अुभारणी जोम धरून अुभीच राहू शकणार नाहीं. नवऱ्यानें 'वधू पाहिजे' म्हणून जाहिरात दिल्यावर व बायकोनें वाटेल तें नांव लिहून पत्र टाकल्यावर लगेच अेक वधूपिता व नेमका त्या नांवाचा गृहस्थ घरांत हजर होणें या घटना करमणुकींतहि त्रास दिल्याशिवाय राहणार नाहींत. वस्तुतः हें वादळ कसें शान्त होणार हाच काय तो गंमतीचा प्रश्न आहे. परंतु जोमदार घटनेच्या अभावीं आणि बोकील व शालन यांचें

जमणार हें दिसत असल्यामुळे नाटक वाचक-प्रेक्षकांच्या मनांत विश्वास अुत्पन्न करूं शकत नाही. त्यामुळेच तिसऱ्या अंकांतील शरद्-शिरीनच्या मांडणाची तालीम व बोकीलांचें दिग्दर्शन हा प्रसंग आपल्या परीनें हास्यपूर्ण असूनहि निरुपयोगी ठरतो. कांही प्रसंग संवादानें अेकत्र गुंफिले म्हणजे नाटक होअूं शकेल असें वाटत नाही.

नाटककार म्हणून प्रथमच पुढे येणाऱ्या बोकिलांच्या 'तारांबळ' या नाटकांत मंगळा-गौरीच्या रात्रीं अुत्पन्न झालेल्या अभाव वादळाचा गंमतीदार प्रसंग अधिक परिणामकारक रीतीनें आला आहे. या घटनेंत जितकी संभाव्यता आहे तितकाच सहजपणें आलेला जोर आहे. यांतला प्रसंगनिष्ठ विनोद मनाची सहज पकड घेणारा व खुलविणारा आहे. मात्र हें नाटक वाचीत असतांना बोकीलांच्या कादंबरीची व बोलपटाची स्मृति अपरिहार्यपणें येते, पण त्या स्मृतीबरोबर तेथली रंगत येत नाही. नवविवाहित दंपतीच्या संसारांतला खास "बोकीलांचा विनोद" यांत अजिबात संकोचला आहे. यामुळे नाट्याचें तंत्र सांभाळतांना बोकीलांचीच तारांबळ अुडाली आहे असें वाटल्यावांचून राहत नाही.

आता अुरतां अुरलीं रूपान्तरित नाटकें. साहजिकच बोकीलांचें 'मीना-नीना' या ओघांत प्रथम नजरेसमोर येतें. 'तारांबळ'प्रमाणे गैरसमजाच्या तत्त्वावर या नाटकाची अुभारणी आहे. त्याला मीना-नीनाच्या सिनेमावेडाची जोड आहे. दोन अंकांपर्यंत नाटक जेमतेम अुभें राहतें पण तिसऱ्या अंकांतला अनाकलनीय गोंधळ पाहून पात्रांच्या प्रतिक्रिया वेड घेऊन पेडगांवाला जाण्यासारख्याच, अतअेव केवळ नाटक लिहून होण्यासाठीच, होत आहेत असें वाटतें. बोकील विनोदी लेखक असूनहि (किंवा असल्यामुळेच) त्यांनी गोरक्षणवाले श्रीधरपंत या नाटकांत केवळ विनोदासाठी घातले आहेत. त्यांचा कथानकाशीं संबंध अेवढाच की ते मीना-नीनाचे मामा आहेत! पण त्या गोरक्षणाचा अेवढा अतिरेक झाला आहे की सगळ्या नाटकाचा अक्षरशः 'गोठा' झाला आहे. या रूपान्तरांत मूळचें स्वारस्य तर नाहींच पण वेगळेपणाची रंगतहि नाही. असलीं रूपान्तरें वॅरीसारख्या श्रेष्ठ नाटककाराची बदनामी करणारींच समजलीं पाहिजेत!

त्या मानाने रंगूमामा जोगळेकर यांचें 'अरे बाबा जाहिरात!' हें नाटक पुष्कळच बरें आहे. यांतल्या भिकार भाषेमुळे हें नाटक वाचवत नसलें तरी तें प्रयोगाची रंगत तरी साधूं शकतें. मात्र विनोदी नाटकांतहि मुळांत जोमदार नाट्यवस्तु नसेल, तर नाटक अुभें राहणें कठिण आहे हें या नाटकावरूनहि पटतें.

ह. वि. देसाअी यांनी अिब्सेनच्या Ghosts या नाटकाचें 'जळतें शरीर' या नांवाने रूपान्तर केलें आहे. लेखकाने मुळांतलीं कांही महत्त्वाचीं वाक्यें तशींच अननुवादित ठेवलीं आहेत, व क्वचित् वाक्यांतील आशयाचें सूक्ष्म स्वारस्य न कळल्यामुळे भाषान्तर शिथिल झालें आहे; पण अनुवादांत लेखकाचा आस्थेवाअीकपणा दिसून आल्याशिवाय राहत नाही. आपल्या मगदुराप्रमाणे त्याने मेहनतींत कसूर केली नाही. सकृद्दर्शनीं 'दिनकर' सुताराचें नांव व पात्र मराठी रूपान्तरांत असंभाव्य वाटतें. या नाटकाला मराठी पेहेराव चढवितांना मुळांतला सुताराचा धंदा तसाच कायम ठेवण्याची कांहीच जरूरी नव्हती. परंतु भाषेच्या बहुतांशीं मराठी वळणाने हा अनुवाद वाचनीय झाला आहे.

खरें पाहिलें तर अनुवाद म्हणून माधव मनोहर यांची 'आजोबांच्या मुली' ही Dear Departed वरून रचलेली अेकांकिका आणि कॅरेल कॅपेकच्या Mother चा 'आअी' हा अनुवाद श्रेष्ठ म्हणून मानायला हरकत नाही. मूळ लेखकाचें स्वारस्य जाणून मराठी पेहराव

चढवितांना माधव मनोहर यांनी योजलेलीं पात्रांचीं नांवें, त्यांच्या स्वभावाचा परिपोष करण्यासाठी आणि 'आजोबांच्या मुलीं'त मराठी वातावरणाचा रंग खुलविण्यासाठी पदरची थोडी घातलेली भर आणि पात्रानुरूप भाषेची केलेली योजना या गोष्टींनी या दोन्ही नाटकांना आदर्श अनुवादाचें स्वरूप प्राप्त झालें आहे निरनिराळ्या स्वभावविशेषांच्या पात्रांच्या यथा-योग्य व खास मराठी अशा वाक्यांनी 'आजोबांच्या मुली'ला जशी रंगत आली आहे, तसेंच 'आअी' या नाटकांतल्या पात्रांच्या नाना...अण्णा...भय्या...बाळ...अशा नांवांनी त्या नाटकां-तल्या कौटुंबिक जिव्हाळ्याला अुठाव आला आहे. आणि भाषेच्या अनलंकृत, अकृत्रिम, प्रवाही स्वरूपाने मूळ नाटकांतल्या भव्योदात्त आणि करुणगंभीर भावाचा सुंदर आविष्कार झाला आहे. मुळांत 'मदर' हें नाटकच त्याचें तंत्र, रचना व ध्येयप्रणालि यांनी जागतिक नाट्य-वाङ्मयांतसुद्धा वेगळें असें अुमटून पडणारें आहे. युद्धावर कामास आलेल्या आपल्या सासरा, पति व पोटच्चीं मुलें यांच्या दुःखाने व्याकुळ झालेली आअी, छोट्या बाळाचें युद्धाच्या वेडा-पासून कसोशीने रक्षण करते परंतु शेवटीं हीच माता 'रणांगणावर जा' म्हणून त्याला जो आदेश देते तो "आशावादाचा मूर्तिमंत संदेश आहे. अुद्यां अुदय पावणाऱ्या नव्या जगांतल्या नव्या सूर्याचा तो पहिला प्रकाशकिरण आहे" (आअी, प्रस्तावना पा. १६). अुत्कृष्ट कला-कृतींच्या अनुवादाने अुत्कृष्ट वाङ्मयांत नेहमीच मौलिक भर पडत असते. या दृष्टीने मराठी नाट्यवाचक माधव मनोहर यांचा ऋणी राहील.

या धावत्या समालोचनांत पाहिलेल्या नाटकांची संख्या जवळ जवळ तीस आहे. दोन वर्षांपूर्वी मराठी रंगभूमीची अवस्था मृतप्राय अशी वाटत होती; आतां शतसांवत्सरिक महोत्सव जवळ आल्याने म्हणा किंवा लोकांच्या नाट्याच्या आवडीने पुन्हा अुसळी मारल्यामुळे म्हणा, या महर्गतेच्या काळांतहि अितकीं नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत ही विचार करण्याची गोष्ट आहे. याशिवाय अुपलब्ध न झालेलीं किंवा प्रयोगरूपानेच केवळ पुढे आलेलीं नाटकें किती असतील कोणास ठाअूक ! याच कालखंडांत मुंबअीला रेजिसर पार्श्वनाथ आळतेकर यांचें 'लिट्ल् थिअेटर', रांगणेकरांचें 'नाट्यनिकेतन', 'मराठी नाट्यालय', 'आदर्श नाट्यालय' आणि पुण्याला 'के. नारायण नाट्यसंघ' या संस्थांनी बरींच नाटकें पुढे आणलीं. मुंबअीच्या 'लोकनाट्य' या संस्थेने तु. कृ. सरमळकृत 'दादा', 'धनी' व डांगेकृत 'गुरुदेव' हीं मराठी नाटकें प्रयोगप्रत्यक्ष केलीं. याशिवाय ठिकठिकाणीं 'क्लब्स्' किंवा 'संघ' असतीलच. अेकट्या मुंबअींत स्त्र्यांयशीं संघ असल्याची ग्वाही अेकाने दिली होती ! वरेरकर म्हणाले होते, त्या-प्रमाणे नाटकाचा धंदा बुडाला होता, रंगभूमी कांही मेली नव्हती, हेंच खरें ! आणि 'नाना-रसलोकचरित' दाखवणारें नाट्य मानव असेतोंपर्यंत नाश पावणार नाही यांत कांही संशय नाही.

परंतु या आशावादांत हुरळून जाण्यापूर्वी कांही गोष्टींकडे सावधानतेने नजर टाकणें अग-त्याचें आहे. या तीस नाटकांतून स्वतंत्र असें वरेरकरांचें 'शिखरावरून' आणि माधव मनोहरांचें रूपान्तरित 'आअी' हीं दोनच नाटकें नव्या मैलाच्या दगडासारखीं मार्गदर्शक ठरतील. बाकीच्यांतलीं कांही नाटकें क्वचित् अपरिचित नव्या वाटा दाखवणारीं असलीं तरी बहुसंख्य नाटकें नाट्यगुणांनी मुरमाड, भरताड याच सदरांत जमा करावीं लागतील. याचीं कारणें पुष्कळ असूं शकतील. परंतु अेक तर रंगभूमीवरच्या कित्येक जीर्ण संकेतांचा मोह अजून आमच्या नाटककारांना सुटत नाही असें वाटतें; त्याशिवाय बहुप्रवेशी रचना, स्वगतें आणि पात्रपरिपोषापेक्षा स्वतःच्या भाषासामर्थ्याचा डौल मिरविणारीं वाक्यें दिसतीं ना. या बाह्य तंत्रांतच प्रगति आहे असें नाही. शेक्सपिअरने अिब्सेनचें तंत्र न पाळतांहि (!) सर्वश्रेष्ठ

नाटकांची निर्मिति केली आणि आधुनिक काळांतहि पाश्चात्य लेखकांत अर्न्स्ट टॉलरसारखा नाटककार सर्व तंत्रें झुगारूनहि अुत्कृष्ट कलाकृति निर्माण करूं शकतो. परंतु या तंत्राचा समज-पूर्वक केलेला स्वीकार लेखकाच्या बदलत्या दृष्टिकोनाचा द्योतक ठरल्याशिवाय राहत नाही. सामाजिक नाटकांतून हें नवें तंत्र कमी अधिक यशाने आणण्याचा प्रयत्न बहुतेक जण करीत आहेत. परंतु हें तंत्र साधतांना नाट्यविषयाचा व त्याच्या आविष्काराचा जो प्रकाश लेखका-च्या मनांत पडावयास पाहिजे तो कांही तितकासा पडलेला दिसत नाही. म्हणूनच पुष्कळच नाटकांतला अेकांकी अेक-प्रवेश हा तीन-चार प्रवेश अेकत्र जोडल्यासारखा होतो; त्यांत जी सुसंबद्ध अेकता पाहिजे ती अुतरली असें वाटत नाही. शिवाय रंगभूमीसाठी पौराणिक व अैतिहासिक नाटकेंहि हवींत. अशीं नाटकें या नव्या तंत्रांतून मांडण्याचा अेकहि प्रयत्न अजून तरी झाला नाही.

नाटकाच्या बोकांडीं बसलेलें दुसरें अेक दैवत संगीताचें होय ! पूर्वीच्या रागदाऱ्यांतून आता भावगीतांवर मजल आलेली असली, आणि पद्यप्रधान रचनेंतून वरेरकरांचीं नाटकें तीन-चार गीतांवरच आलीं असलीं तरी, संगीताचा सासुरवास अजून संपलेला नाही. सामान्य नाटकां-मधून गाणें सारखें पेरलेलें आहे. त्याची सयुक्तिकता किंवा वास्तवता याचा विचार फारसा नाटककाराने केलेला दिसत नाही. प्रेक्षकांची मागणी व लेखकांचा पुरवठा यांतून कोणतें नेमकें याला जबाबदार आहे हें ठरवणें कठिण ठरेल; परंतु आम्हां मराठी प्रेक्षकांची गायनाभिरुचि जमेस धरूनहि जें तयार होतें तें विकतें हा अर्थशास्त्राचा न्यायहि विसरतां येत नाही. अप्रयो-जक व गल्लाभरू गाण्याने मूळ नाट्यवस्तूला धक्का पोंचतो याची जाणीव नाटककारांना हवी आहे. रांगणेकरांनी नाटकांतलीं सारीं पदें आरंभीं किंवा शेवटीं सलग छापण्याची योजकता दाखविली असली तरी, त्यांच्या नाटकांची दृष्टि पेटीकडेच आहे हें स्पष्टपणें दिसतें. वास्तविक संगीताची आवड 'ऑपेरा'पद्धतीचीं नाटकें लिहूनहि मनमुराद भागवतां येअील, व संगीताचा स्वतंत्र सुभा नाट्यवाङ्मयांत स्थापितां येअील. परंतु अशी कल्पना कोणाला आली नसावी किंवा हें 'धाडस' करण्याची कोणालाहि अिच्छा झाली नसावी.

असाच अेक जीर्ण संकेत म्हणजे या नाटकांतून वावरणारीं गडी, नोकर, मोलकरीण, सैंपाकीण हीं पात्रें. या पात्रांचा अुपयोग जरूर तेवढाच न होतां तीं नाटकाचें अेक प्रमुख आकर्षण होअून बसतात ('नवीन कल्पना' आणि 'तारांबळ' पाहा).

अशा पात्रांचा मोह रांगणेकरांना तर टाळतां आला नाहीच परंतु वरेरकरहि या संके-ताला बळी पडले आहेत. ('माझ्या कलेसाठीं' पाहा). या पात्रांकरवीं साधणारा ठराविक ठशाचा विनोद आता पुरे झाला असेंच रसिकाला वाटल्याशिवाय राहणार नाही. या खोगीर-भरतीने बिनीआघाडीची कोंडमार होअील या गोष्टीकडे आमच्या नाटककारांनी लक्ष देणें नाट्यदृष्ट्या अगत्याचें आहे.

परंतु त्याच्या अगोदर कदाचित् मराठी नाटकांच्या मानगुटीस बसलेलें विनोदाचें दैवत हलवणें जरूर होअील. आचार्य अत्रे यांनी विनोदी नाटकें लिहून रंगभूमीला अूर्जितावस्था आणली हें केव्हाहि अमान्य होणार नाही. परंतु या प्रयत्नांतच अेका अनिष्ट प्रथेचीं बीजें रोवलीं गेलीं हें सुद्धा तितकेंच खरें आहे. मराठी रंगभूमीवर पूर्वी काय विनोद अभावाने तळपत होता ? पण आता नाटक म्हटलें म्हणजे करमणूक– ती करमणूक करण्यासाठी प्रेक्षकांना हसवलेंच पाहिजे– त्यासाठी विनोदी, गमतीदार सुखात्मिकाच पाहिजेत असा संकेत ठरून गेल्यासारखा झाला आहे. नाटककार अशा अुथळ नाटकांनाच जन्म देत आहेत, आणि सव-

यीने चटावलेला प्रेक्षक अशाच नाटकांना गर्दी करून सोडीत आहे. पण पार्श्वनाथ आळते-करांचे प्रयत्न, के. नारायण काळ्यांचें 'घरकूल' किंवा रांगणेकरांचें 'नंदनवन' पडलें, आणि 'आशीर्वाद', 'कुलवधू' किंवा 'कन्यादान' या नाटकांनी अलोट पैसा दिला या सत्यकथांवरून लोकाभिरुचीचा कल अजमावण्याचा प्रयत्न केला तरीहि फसगत झाल्यावाचून राहणार नाही. कारण खेळकर, विनोदी नाटकेंच तेवढीं लोकांना आवडतात अशी समजूत करून घेतांना 'अरे बावा जाहिरात !', 'पेल्यांतील वादळ' आणि 'मीना-नीना' या नाटकांचा बोजवारा अुडाला हें ध्यानांत ठेवणें महत्त्वाचें आहे. लोकांना खरेंखुरें नाट्य हवें असतें हेंच यावरून दिसतें. आज सिनेमानटींना रंगभूमीवर आणून रांगणेकर अलोट पैसा सांठवीत असले तरी अेकदा हें जिवंत माणसें जवळून प्रत्यक्ष पाहायचें कुतूहल ओसरलें की लोक दृश्य नाट्याचा विचार केल्याशिवाय राहणार नाहीत. वस्तुस्थिति अशी आहे की संगीत, विनोद, 'सेक्स-अपील' याच गोष्टींनी करमणूक होते हा समजच मुळीं निराधार आहे.

परंतु नाटककारांनी स्वतःचा गैरसमज तरी करून घेतला आहे किंवा या अनिष्ट प्रथेला मान तुकविल्याशिवाय त्यांचें चालत नसावें— म्हणजे पैसा अुभा राहत नसावा ! लोकांच्या रुचीला वळण लावण्याचें काम लेखकांचेंच आहे. परंतु ज्या वृत्तीला कदाचित् प्रेक्षक चटावले आहेत त्याच वृत्तीचे बळी स्वतः लेखक झाले आहेत; म्हणूनच आजच्या सामाजिक नाटकांत सामाजिक प्रश्नाकडे ताठरपणाने पाहायची ताकद नाही. सामाजिक प्रश्नाचें अवसान आणून लोकप्रियतेच्या सोप्या तंत्रांत अवसान पावलेल्या नाटकांची पैदासच अधिक होते आहे. वास्तविक नाट्यविषयाचें आमचें क्षेत्र बरेंच रुंदावलें असल्याची जाणीव समालोकित नाटकांतूनहि झाल्यावाचून राहत नाही. मध्यमवर्गीय स्त्रीपुरुषांपुढे पडलेल्या प्रश्नांचे पडसाद त्यांत अुमटत आहेत आणि केवळ खालच्या वर्गाच्या जीवनाचें चित्रहि त्यांत दिसतें आहे; परंतु हे प्रश्न हाताळण्याचा आमचा मार्ग, कांही अपवाद सोडल्यास, अति अुथळ आणि विनोदी आहे ! याच मार्गाचा अवलंब केल्याने जीवनाची पकड नाटककारांना आलेली नाही आणि ढिसूळ रचना आणि गाण्याच्या व विनोदाच्या टप्प्याटप्प्यांनी केलेली संवादांची गुंफण असें त्या नाट-कांचें बहुतांशीं रूप झालें आहे. नाट्याच्या अवनतीचीं बहुविध कारणें आहेत. परंतु प्रतिमा-वान् नव्या नाटककाराचा अभाव हा अेक त्यांतलें महत्त्वाचें कारण आहे असें या समा-लोचनानंतर पटल्यावाचून राहत नाही. वास्तविक गंभीर व कलात्मक नाटकांचा आदर्श मुद्दाम शोधण्यासाठी दूरदेशीं जायला नको; परंतु हवा असल्यास तोहि 'आअी' नाटकाने मराठींतच प्राप्त झाला आहे. मराठी नाट्यवाङ्मयाचा सकसपणा वाढवायला आणि नाट्यगुणांनी अभि-मान अुत्पन्न करायला 'आअी'चेंच बोट धरून जाणें भविष्यकाळीं अुपकारक ठरणार आहे. या नाटकाच्या प्रस्तावनेंत शेवटीं खांडेकर सार्थ जाणीवेने म्हणतात,

"मराठी रंगभूमि सध्या निश्चेष्ट पडली असली तरी तिची ही दीर्घकालीन मूर्छा आहे, ही कांही मृत्यूची छाया नव्हे....तिच्या नव्या वैभवाचा काळ दूर नाही. पण हें वैभव मागणी तसा पुरवठा या न्यायाने माल पुरविणाऱ्या नाटकांच्या कंत्राटदारांकडून तिला प्राप्त होणार नाही. 'वन्समोअर' आणि हंशा यांच्यावरच सर्व भरंवसा टेवून रंगभूमीला नवें वळण लाव-ण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारेहि तिचें अैश्वर्य परत आणूं शकणार नाहीत. हें काम नुसत्या कलावंतांचेंहि नाही. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत होअूं घातलेल्या क्रांतीची ज्यांना चाहूल लागली आहे, नाटक हें कल्पनेच्या दृष्टीने जितकें रम्य तितकेंच प्रचाराच्या दृष्टीने परिणामकारक असें साधन आहे अशी ज्यांची श्रद्धा आहे, बहुजनसमाजाच्या अुद्याच्या आशा-आकांक्षांशीं समरस

होण्याअितकें व्यक्तित्व ज्यांनी कमावलें आहे, सवंग लोकप्रियतेपेक्षां अभिजात कलेकडेच ज्यांचें अधिक लक्ष आहे, आणि 'मदर'सारखे आदर्श ज्यांच्यापुढे आहेत, अशाच प्रतिभावंतांकडून हें काम होअील. कॅपेकचें हें नाटक यशाचा मार्ग त्यांना स्पष्टपणें दाखवील यांत मुळींच शंका नाही.''

गो. के. भट

## कादंबरी

गेल्या ऑक्टोबरनंतर प्रसिद्ध झालेल्या नवीन मराठी कादंबऱ्यांचीं नांवें आठवूं लागलों की ज्यांचीं नांवें विशेषत्वाने डोळ्यांपुढे येतात त्या कादंबऱ्या अर्थात्च फडके, खांडेकर, माडखोलकर, वरेरकर अित्यादि अनुभवी लेखकांच्याच आहेत. नाही म्हणायला कृष्णाबाअी मोटे ह्यांची 'मीनाक्षीचें जीवन' ही कादंबरी मात्र जरी ती लेखिकेची पहिलीच कादंबरी असली तरी झटकन् नजरेसमोर येते. स्त्री आणि पुरुष अेकत्र येतात ते केवळ बौद्धिक भूक भागविण्यासाठी नव्हे; ह्या भुकेची आधुनिक काळांत जरी त्यांना विशेष निकड भासत असली तरी त्याहूनहि अधिक निकड त्यांना अितर भुकांची जाणवणारच, व त्यांचें योग्य समाधान ह्या नाही त्या कारणामुळे न झाल्यामुळे त्यांचें कुटुंबजीवन कसें दुःखात्मक होतें, हें अेका बुद्धिमान् परंतु अंगांतील स्त्रीत्व न गेलेल्या स्त्रीच्या चक्षूंतून पाहण्याचा अत्यंत कलात्मक प्रयत्न ह्या छोटया कादंबरींत केला आहे. डॉ. कुळकर्णी ह्यांच्या बौद्धिक जीवनाशीं समरस होण्याचा निकराचा प्रयत्न करूनहि मीनाक्षी आपलें कुटुंबजीवन सुखी करूं शकत नाही. तिच्या जीवनांतील रमेशच्या सहवासांतील कालखंडाचें चित्र लेखिकेने ज्या संयमाने व ज्या कलात्मक अलिप्ततेने केलें आहे तो कलात्मक संयम अुच दर्जाचा आहे. कादंबरीच्या शेवटीं सूचित केलेला मीनेचा आत्महत्येचा प्रयत्न व त्यानंतर झालेलें अप्पासाहेबांचें मनोदर्शन ह्या दोन्ही गोष्टी मात्र रसापकर्षक वाटतात. त्या कदाचित् अत्यंत वास्तव असतील परंतु प्रस्तुत कथेंतील त्यांची योजना ही तिच्यांतील अर्थपूर्ण संयमाला थोडीशी बाधकच ठरते. ह्या कादंबरीच्या दुसऱ्या भागाची रसिक वाट पाहत असल्यास नवल नाही.

वर ज्या अनुभवी कादंबरीकारांचीं नांवें घेतलीं आहेत त्यांतील श्री. माडखोलकर यांच्या 'डाकबंगला' ह्या कादंबरीखेरीज अितर कादंबऱ्यांत राजकारण हाच विषय प्रामुख्याने आलेला आहे. भाडोत्री कथानक, कृत्रिम सजावट व बनावट भावनांचें रोगट प्रदर्शन असें 'डाकबंगला' ह्या कथेचें स्वरूप आहे. कथाविषयांत कांही वैशिष्टय किंवा नवीनता आहे अशांतला प्रकार नाही; मांडणींतहि नाही. त्यांत 'तरुण मनाची विलक्षण ओळख' होत असल्याचा प्रत्यय प्रस्तावनालेखकाला येत असेल परंतु वाचकाला तो अेके ठिकाणींहि येत नाही; अेका अैकीव कथेच्या चौकटींत वावरणारीं ह्या कथेंतील पात्रें, म्हणजे अेकच पात्र,— हीं हलतीं, बोलतीं, चालतीं, अगदी मोजून शब्द बोलणारीं व पाअुलें टाकणारीं व प्रत्येक पदाघाताबरोबर व शब्दोच्चाराबरोबर अन्तःकरणांतील भाव— म्हणजे अेक विशिष्ट परिणाम साधण्यासाठी त्यांच्या अन्तःकरणांत जे भाव अुमटावेत असें लेखकाला वाटतें ते भाव— व्यक्त करणारीं आहेत; परंतु तीं जिवंत आहेत असें कोठेहि वाटत नाही. चौकीदार व खानदाभे, तळ्याबाहेर ओढून काढलेल्या प्रेताभोवतालचीं माणसें— सगळेच आवश्यक तेवढ्या भागावर हवें तितकें व हवें तसें (हाव)भावयुक्त अथवा नाटकी— संभाषण नव्हे,— भाषण करीत आहेत. शिवाय निसर्गसुद्धा आपली भूमिका कसोशीने वठवीत आहे. चार भाषणें झालीं की दहा ओळी निसर्गवर्णन येतेंच.

वर्णनें व संवाद ह्यांचें अेकमेकांशीं जें प्रमाण कलाकारागिरांनी ठरविलेलें आहे तेंच ह्या कथेंतहि साधलें आहे.

वर्णनें, संवाद व त्याचबरोबर भूमिकांची योजना व अुभारणी ह्यांबाबत वर वर्गिलेलाच ठोकळेबाजपणा माडखोलकरांच्या 'चंदनवाडी' व 'प्रमद्वरा' ह्या दोन्ही नव्या कादंबऱ्यांतून आढळून येतो. 'चंदनवाडी'तील अभि, अवधूत व सिराज हीं पात्रें अवास्तव आहेत; ज्यांना आपण इंग्रजींत idealized असें म्हणूं तशीं तीं बहुंशानें आहेत. ह्या तीनहि व्यक्ति कल्पना-साम्राज्यांतून निर्माण केलेल्या अतअेव अेका वेगळ्याच काल्पनिक जगांत वावरणाऱ्या अशा झालेल्या आहेत. कॉलेजांतील हल्लीच्या तरुण पिढीकडे पाहिलें असतां त्यांत असले किती अभि, अवधूत व सिराज सांपडतील हा प्रश्न आहे. स्वतःच्या म्हणजे लेखकाच्या डोक्यांतून निर्मिलेल्या अेका काल्पनिक जगांत हीं माणसें चहा-कॉफीचे घोट घेऊन अंमल केलेल्या माणसांप्रमाणे वाद करीत वावरत आहेत. त्यांच्यांतील तत्त्वनिष्ठेच्या मोठमोठ्या बाता मारणारा अवधूत कादंबरीच्या शेवटीं वासनेच्या आहारीं जातो, व त्याच्या अेका रात्रीच्या (अति)प्रसंगानें कादंबरीचा शेवट कसा करावा हा माडखोलकरांना पडलेला पेचप्रसंग सुटतो. सगळें वातावरण खोटें, जीर्ण संकेतांना चिकटून राहिल्यानें निर्माण झालेलें असें आहे. ज्या ज्या पात्राला माडखोलकर कादंबरींत महत्त्व देतात तें तें पात्र कादंबरीच्या शेवटीं शेवटीं खोटें, फाजील फुगवलेलें, अपार्थिव असें वाटूं लागतें. ज्या पात्रांकडे ते कमी लक्ष देतात, तींच पात्रें त्यामुळे अुठावदार होतात (अुदाहरणार्थ येसू).

आपल्या प्रत्येक कादंबरींत कांहीतरी अेखाद्या स्थळामोंवतीं रेंगाळणारें रम्याद्भुत चितारावें अशी माडखोलकरांची अेक प्रवृत्ति दिसते. ह्या कादंबरींत जें कॅथॉलिक मिशनचें वर्णन आलें आहे त्याची योजना थोडीबहुत ह्याच कारणासाठी झालेली असावी. वाचकांना स्थळाच्या अपूर्वाअीनें थोडेंसें चकित करावयाचें व मग त्यांच्या मनांतील अद्भुताविषयींच्या कुतूहलबुद्धीला खाद्य मिळेल, अशा तऱ्हेनें त्याचें अुदात्तरम्य वर्णन करावयाचें; त्यासंबंधी थोडी भीति, बरेंचसें कुतूहल आणि जमल्यास पूज्यबुद्धि निर्माण करावयाची, ही माडखोलकरांची रीत आहे. अशा प्रकारचें वातावरण ते चांगलें रंगवूं शकतात. परंतु त्यांत मग कठोर वास्तवाला फारशी जागा अुरत नाही; ह्या चित्रणांच्या दर्शनांतून अशा स्थळीं अखंड वावरणाऱ्या ढोंगाची, खोटेपणाची, दांभिकतेची, हीनमूल्यशोधनाची जाणीव वाचकांना होत नाही; मग हें ढोंग अुघड करण्याकरिता वेगळे चर्चात्मक परिच्छेद लिहावे लागतात. माडखोलकर आत्यंतिकतेंत सदा समाधान मानतात. ह्या कादंबरींतील मिशनच्या चित्रणांतील अद्भुतता अकारण आहे. थोड्या कठोर वास्तवतेनें जर माडखोलकर ह्या अेकाच विषयाकडे पाहते तर त्यांना त्यांत अेका मोठ्या कथेचीं बीजें आढळलीं असतीं; परंतु असें म्हणणें म्हणजे माडखोलकरांना 'आपण माडखोलकर बनूं नका' असें म्हणण्यासारखें आहे.

ह्या कादंबरींत जें कथाबीज आहे तें अुत्तम आहे; परंतु त्याचा परिपोष करतांना प्रत्यक्ष पात्रांच्या आयुष्यांतील बहुविध नाट्यात्मक घटनांचा कलात्मक आविष्कार करण्याअैवजी कथा-निवेदनाची पद्धत बऱ्याच ठिकाणीं आली आहे व प्रत्यक्ष कथासूत्राला मदत न करणारीं अशीं चर्चात्मक प्रकरणें कादंबरींत जागजागीं दिसतात. त्यामुळे यांतील कथाचित्रण हें पुष्ट नाही; ह्याचाच अर्थ असा की, ज्या जीवनाचें तिच्यांत कलात्मक चित्रण यायला हवें त्याचा थांगपत्ताहि प्रत्यक्ष कादंबरींत लागत नाही. अस्पृश्यांच्या किंवा गिरणींत काम करून अुदरनिर्वाह करणाऱ्या मराठमोळ्यांच्या जीवनाचें विविध दर्शन व त्या द्वारें व्हावयाचें समाजदर्शन यांत

होत नाही. ह्यांतील पात्रें हीं त्या समाजांतील आहेत हें तीं अधूनमधून करीत असलेल्या कांही कुलधर्मांवरून व कादंबरीकारांच्या सांगण्यावरून मानायचें.

फडक्यांचें 'शाकुंतल' व खांडेकरांचें 'क्रौंचवध' ह्यांत बरेंचसें साम्य आढळतें ही गोष्ट खरी आहे परंतु ह्याचा अर्थ अेका लेखकाने दुसऱ्या लेखकाच्या कथानकाचा सांगाडा अुचलला आहे असा नव्हे; तर आज जी 'राजकारणी' कादंबरी म्हणून नवी कादंबरी मराठी कथावाङ्मयांत अवतरूं पाहत आहे तिचें स्वरूपच सांचेबंद आहे. ध्येयनिष्ठ, राष्ट्रीय बाण्याचा पिता, त्याची कट्टर कॉंग्रेसवादी कन्या, तिचा क्रांतिवादी प्रियकर व प्रतिगामी पति आणि ह्या सगळयांच्या मेळव्यांतून निर्माण होणारें व आधुनिक किंवा कांही वर्षांपूर्वीच्या राजकीय चळवळीच्या पार्श्वभूमीवर चितारलेलें त्यांतील ठरीव ठशाचें अद्भुत नाट्य हा आजच्या मराठी राजकारणी कादंबरीचा सांचा ठरूं पाहत आहे. पात्रांचीं नांवें मात्र भिन्न. अेका कादंबरींतील पिता हा संस्कृतचा अेकच अेक श्लोक घोकणारा व शिकविणारा संस्कृतचा प्रोफेसर असेल तर दुसरींतील अेक रसायनशास्त्रज्ञ असेल; आणखी किरकोळ फरक असतील, परंतु परिणाम अेकच. शेवट जवळ जवळ त्याच्या नाटकीपणाच्या (melodrama) बाबतींत सारखाच असेल. सदर कादंबऱ्यांतून अेकाच दगडाने दोन पक्षी मरतात– प्रेम आणि राजकारण; व वाचकांना अेकाच वेळीं अेक नवलकथा, अेक प्रेमकथा व अेक अगदी अलीकडच्या राजकीय चळवळीचा कादंबरीमय अितिहास अित्यादि गोष्टी अेकदम वाचल्याचें संमिश्र समाधान लाभतें. शिवाय ज्या वाचकांना खांडेकरांचे अुत्प्रेक्षा-रूपकांचे रजतपटच आवडतात व ज्यांना फडक्यांचीं नक्षीदार व झिलअीदार वर्णनेंच आवडतात त्यांचीहि भरपूर सोय वरील कादंबऱ्यांतून होते. 'क्रौंचवधां'तील प्रमेय खांडेकरांच्या वृत्तींतून निर्माण झालेलें आहे व म्हणूनच त्याचें कादंबरींत ओढूनताणून अवतरण करतांना त्यांची मोठी धांदल अुडालेली आहे. फडक्यांच्या डोळयांपुढे तसलें कांही प्रमेय नाही हें खरें आहे.

ह्याच राजकारणी कथेच्या साच्यांतून काढलेली आणखी अेक कथा म्हणजे माडखोलकरांची 'प्रमद्वरा' ही आहे. हिची चण लहानच असल्यामुळे वरच्या कांही भूमिकांना तिच्यांत थारा नाही. प्रमोद व प्रमद्वरा ह्यांच्या सुखी संसारांतील अेकच अडचण म्हणजे त्यांचे भिन्न राजकीय पक्ष (अेक अर्थातच कट्टर कॉंग्रेसवादी तर दुसरा थोडाफार कम्युनिस्ट). ही अडचण कादंबरींतील साठसत्तर पानांतील खलबतानंतर घडणाऱ्या अेका रम्याद्भुत घटनेनंतर नायिकेला आजारी पाडून व तिचें टेंपरेचर अुतरण्यासाठी म्हणून प्रमोदला तिच्याशीं राजकारणाच्या बाबतींत सहकार्य करण्याबाबत वचन द्यावयाला लावून कादंबरीकाराने मोठ्या कुशलतेने दूर केली आहे. ह्या कादंबरींत थोड्या थोड्या प्रमाणांत माडखोलकरांच्या कादंबरीलेखनाचीं सगळीं वैशिष्ट्यें आहेत. तत्त्वचर्चा आहे, निसर्गवर्णनें आहेत, क्रांतीचीं खलबतें आहेत, कांही सुंदर प्रसंगवर्णनें आहेत, भरपूर चहा-कॉफी व कोको आहे. ही कथा अेका पुराणकथेच्या चिंतनांतून स्फुरलेली आहे असें लेखक म्हणतात. कदाचित् तसें असेलहि. परंतु आहे त्या स्वरूपांत ही कथा म्हणजे अतिरंजित कथनाचा अेक मासला म्हणून लक्षांत राहील.

राजकारणात्मक कादंबऱ्यांच्या यादींतच श्री. वरेरकर ह्यांची 'शिपायाची बायको' ही अलीकडील कादंबरी पडते. आरंभीं आरंभीं ही कथा थोडीशी रेंगाळते, परंतु पुढे आपल्या अन्तःसामर्थ्याने ती हळूहळू चोखंदळ वाचकाचें मन आकर्षून घेते. कथेंत पात्रें अगदीच मोजकीं, म्हणजे मुख्यतः तीन चारच, आहेत व ह्या अल्पसंख्य पात्रांच्या वरूनवरून संयपणें चाललेल्या जीवनांतील अन्तःकलह लेखकाने मोठ्या संयमाने व म्हणून कलात्मकतेने दाखविला आहे.

अनुक्रमणिका

ह्या कथेंतील 'शिपायी' जो 'दादा' त्याच्या तोंडीं दिलेलीं अशीं ह्या सर्व कथेंतील वाक्यें जर गोळां केलीं तर तीं पान दोन पानेंहि भरणार नाहीत; परंतु कथेच्या अन्तीं त्याचें चित्र जितका मनावर परिणाम करतें तितका सूचक परिणाम प्रत्यक्ष सुलू (वहिनी) व अुषा ह्या दोन स्त्री-भूमिकांच्या व्यक्तिदर्शनांनीहि होत नाही. मामा स्त्रीभूमिका पुरुषभूमिकांपेक्षा अधिक चांगल्या रंगवितात असें म्हणतात; परंतु कलात्मकतेच्या दृष्टीने पाहतां प्रस्तुत कथेंत दादा (रावसाहेब) व बाळाभाअू ह्यांचींच चित्रें अत्यंत सरस अुतरलीं आहेत. विशेषतः रावसाहेबांचें चित्र रेखाटतांना मामांनी जो संयम दाखविला आहे तो अत्यंत कलापूर्ण आहे. ह्या कादंबरींत गोवलेल्या राजकीय वातावरणाशीं कथेंतील पात्रें खूपच अेकरूप झालीं आहेत. राजकारण हें ह्या कादंबरीच्या जीविताचें मुख्य अंग आहे हें निश्चित.

अगदी सुरुवातीला सुलू ह्या पात्राच्या परिपोषासंबंधी मामांच्या मनांत नीटशा निश्चित कल्पना नसाव्यात असें वाटतें; कारण तसें जर असतें तर त्यांनी कथनाच्या सुरुवातीसच जे रंग भरावयास पाहिजे होते ते अुशीरा भरले नसते. फौजदारदादा व राष्ट्रप्रेमी वहिनी ह्यांच्या विसंवादी वैवाहिक जीवनाचें परिणामकारक चित्र मामा कादंबरीच्या अगदी आरंभींच्या पानांतून नीटसें काढूं शकले नाहीत ह्याचें कारण हेंच असावें. कादंबरीला खरी सुरुवात अुषेच्या आगमनापासून होते, व तेथूनच पुढे कथानकाला खरा रंग भरतो. अुषेचें पात्र निर्माण करून लेखकाने आपले अनेक 'अन्तस्थ हेतु' साधले आहेत हें खरें, परंतु त्यामुळे कादंबरीच्या घडणींत कोठेहि बिघाड झालेला नाही. बाळाभाअू अुर्फ बळवंतराव ह्यांचें पात्र मोठें वास्तवतापूर्ण आहे, आणि त्याच्याच चष्म्यांतून अेकंदर कथाप्रवाहाकडे पाहिलें असल्यामुळे त्या दर्शनाला अेक प्रकारचें मार्दव, हळुवारपणा, निराग्रहीपणा, साशंकता व म्हणूनच वास्तवता आलेली आहे. कथेच्या शेवटीं शेवटीं अनेक वर्षांचे कालखंड अगदी लेखणीच्या फटकाऱ्यासरशी लेखकाने अुडविले असले तरी त्यामुळे कथनकाच्या गुंफणींत व पात्रांच्या स्वभावपरिपोषांत विनाकारण ओढाताण झालेली नाहीं; त्याचा मूळचा ओघ कायम राखण्यांत आला असून त्याच्यांत अथपासून अितिपर्यंत सुसूत्रता राखली आहे. वर निर्देशिलेल्या कादंबऱ्यांप्रमाणे ह्याहि कादंबरींत राजकीय मतांच्या बाबतींत विसंवादी असें सुशिक्षित पांढरपेशे जोडपें आलेलें असलें तरी, कादंबरीलेखनाच्या अनेक जीर्ण पारंपरिक संकेतांपासून ह्या कादंबरीने आपल्या वास्तवचित्रणाने स्वतःची बरीच सोडवणूक करून घेतली आहे. कथनाबाबत जें सरलत्व वरेरकरांनी स्वीकारलें आहे त्यामध्ये अकृत्रिमता आहे.

वर अुल्लेखिलेल्या अितर लेखकांच्या बाबतींत राजकीय आंदोलनांचा रम्याद्‌भुततेकरिता अुपयोग करून घेण्याची धंदेवाअीक दृष्टि दिसते. वाचकांचें मन आकर्षून घेण्यासाठी वास्तवसमाजदर्शनाअैवजी लोकविलक्षण चित्रणाचा अुपयोग फार झाला आहे असें वाटतें.

मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत कांही 'कथात्मक प्रयोग' होत आहेत; निदान मर्ढेकरांनी आपल्या 'रात्रीचा दिवस' ह्या लिखिताला वरील नांवाने संबोधलें आहे. दिक्‌पाल ह्या व्यक्तीच्या जागृत, अर्धजागृत व सुप्त संज्ञाप्रवाहांची, 'त्यांच्या परस्परसंघर्षणाची, त्यांतील क्रियाप्रतिक्रियांची, स्थूलपणें नोंद करण्याचा प्रयत्न' ह्या लिखितांत झाला आहे. मनोविश्लेषण हें केवळ मनोविश्लेषणाकरिताच केल्यास त्याबद्दल कोणास बोल लावतां येणार नाही. परंतु अशा प्रकारचें मनोविश्लेषण हें 'कथात्मक' कसें ठरतें हा प्रश्न आहे. कथेला अुपकारक असेंच जर मनोविश्लेषणाचें— मग तें संज्ञाप्रवाहांतील कोणत्याहि थराचें चित्रण असो— स्वरूप असेल तरच

तें कथात्मक ठरेल. मर्ढेकरांच्या लिखाणांत तें तसें आहे काय हा प्रश्न आहे, व तो प्रश्न सोडविणें दुरापास्त आहे; ह्याचें कारण असें की सदर लिखितांत जें 'मामुली कथासूत्र' आपण ध्वनित केलें आहे असें मर्ढेकर सांगतात त्याचे अस्ताव्यस्त पसरलेले धागे अेकत्र सांधून त्यांना आकार आणण्यासाठी वाचकाला त्यांची मर्ढेकरांच्या अन्तर्मनाअितकीच माहिती असणें जरूरीचें आहे, व तें शक्य नाही. अेकंदरींत प्रयोग ह्या दृष्टीने जरी मर्ढेकरांचा प्रयत्न स्तुत्य असला तरी त्याची अुपकारकता विवाद्य आहे. गो. के. भटांच्या 'प्रणय' कादंबरींत या तंत्राचा थोडा अुपयोग करून घेतला आहे.

समाजजीवनाच्या वेगवेगळ्या अंगांचीं चित्रें रेखाटण्यासाठी लिहिलेल्या कादंबऱ्यांत चिंदरकरांची 'महापूर' ही कादंबरी अुल्लेखनीय आहे. चिंदरकरांनी कोकणांतील अेका खेड्यांतील जीवन अेका कथेच्या द्वारा चितारण्याचा आस्थेवाअीक प्रयत्न केला आहे; परंतु त्यांची नजर मूलतः ग्रामीण समाजजीवनावर केन्द्रित न होतां त्यांतील कांही व्यक्तींवर केन्द्रित झालेली असल्यामुळे व त्यांतहि कांहीं विशिष्ट परिणाम साधण्याचा हव्यास दिसून येत असल्यामुळे त्यांच्या कथेंतील ग्रामीण जीवन हें त्या कथेचा आत्मा ठरत नाही; तर केवळ अलंकरणरूप अशी ती कथेची पार्श्वभूमि ठरते. तरीहि त्यांचा प्रयत्न अुल्लेखनीय आहे, व त्यांतील चाकरमानी हें व्यक्तिचित्र डोळयांत भरण्याजोगें अुतरलें आहे. श्री. शं. कृ. आठवले ह्यांच्या 'प्राणविसावा' ह्या कथेंत पांढरपेशा जीवनाचें कलाहीन चित्रण करतांना जे भडक रंग अुधळले गेले आहेत त्यांची त्यांतील अद्भुततेच्या बाबतींत, बीभत्सतेच्या बाबतींत व प्रमाणशून्यतेच्या बाबतींत ज्या कादंबऱ्या बरोबरी करतील अशांचीं नांवें 'नर्स सुंद्राबाई' (शं. दि. करंदीकर), 'मनोरमा' (श्री. परमेकर), 'आंदोलन' (श्री. पैठणकर) हीं आहेत. अेक वैशिष्टयहीन व परिणामशून्य कादंबरी म्हणून सौ. शान्ताबाई नाशिककर ह्यांच्या 'कीर्ति' ह्या कथेचा अुल्लेख केला पाहिजे. नाविक जीवनावर आधारलेली श्री. न. चिं. केळकर ह्यांची 'कोकणचा पोर' ही नवलकथा म्हणजे पुरातन कथालेखनाचा अेक प्रकार आहे. श्री. ना. धों. ताम्हनकर ह्यांची 'मामा' ही व्यक्तिचित्रणात्मक कथा त्यांच्या तत्समान कथांप्रमाणेच विशिष्ट हेतुपूर्ण चित्रणाचा नमुना आहे.

अनुवादित कथांच्या यादींत अर्थात्च श्री. वरेरकर ह्यांनी अनुवादिलेल्या वंग कादंबरीकार शरच्चंद्र चट्टोपाध्याय ह्यांच्या 'गांवगंगे'नंतरच्या 'काशीनाथ', 'माधवी', 'भैरवी', 'विजया' व 'विराजवहिनी' ह्या कादंबऱ्या पडतात. ह्यांतील पहिल्या दोन केवळ भावकथा आहेत व त्यांतील भावाकुलता वंगजीवनाच्या दृष्टीने कदाचित् वास्तव असली तरी तुमच्या आमच्या मनाला तितकीशी निरोगी वाटत नाही; 'भैरवी'ची रचना शिथिल वाटते व तिचें वाचन कंटाळवाणें होतें. तीच गोष्ट 'विजया' ह्या कथेची. ब्राह्मसमाजाची दीक्षा घेतलेले वंगालमधील बडे जमीदार कसे वागत असत हें दाखविण्यासाठी जरी ही कादंबरी मूलतः लिहिलेली असली तरी विजया व नरेन्द्र ह्यांच्या संयमपूर्ण प्रणयानेच हिचें वातावरण रंगलेलें आहे. 'विराजवहिनी' ह्या कादंबरीची रचनाहि 'भैरवी'प्रमाणेच शिथिल आहे. लोकसाहित्यातर्फे प्रसिद्ध झालेले अप्टन सिंक्लेअर ह्यांच्या 'नो पासारान्' ह्या कथेचें मापान्तर बरेंच चांगलें अुतरलें आहे. सिंक्लेअरच्या मूळ कथेंत व्यक्त होणारी त्याच्या अंतःकरणांतील फॅसिस्टविरोधी तळमळ तें व्यक्त करूं शकतें. जॅन व्हॅल्टिनच्या आत्मकथेचा प्रो. फडके ह्यांनी केलेल्या 'वादळ' हा अनुवाद कादंबरी ह्या नांवाने ओळखला जात असला तरी त्यांतील रम्याद्भुतता ही आत्मचरित्राची आहे, कादंबरीची नव्हे. जॅन व फिरेलाय ह्यांच्या अुदात्त प्रणयी जीवनाचे धागे ह्या लिखितांत सर्वत्र पसरलेले असले, आणि त्यामुळे त्यांतील आत्मीयतेंत व रंजकतेंत भर पडत असली, तरी

पुस्तकाचा मूळ अुद्देश स्टॅलिनप्रणीत कम्युनिस्ट पार्टीच्या स्वार्थी, संकुचित वृत्तीच्या व मूळच्या अुदात्त हेतूपासून त्यांना च्युत करूं पाहणाऱ्या, कारवाया दर्शविण्याचा असल्यामुळे जेन व फिरेलाय ह्यांचें कारुण्याद्‌भुत जीवन हें पुस्तकाचें अुपकथानक ठरतें. कांही असलें तरी मूळ पुस्तकाचें कोठेहि यत्किंचितहि विडंबन न करतां अुलट त्यांतील आकर्षकता वाढवून फडक्यांनी मोठ्या कलात्मकतेने भाषान्तर केलें आहे ह्यांत संशय नाही. ह्याशिवाय अनुवादित कादंबरी आठवते ती व्यं. अ. पै रायकर ह्यांची 'तीन तरुणी' ही. पोर्तुगीज वाङ्मयांतून नेमकी हीच कलाहीन कथा भाषान्तरासाठी लेखकाने कां निवडली हें कळायला मार्ग नाही.

साने गुरुजींच्या कांही कथा व नाथमाधवांचें कांही साहित्य गेल्या वर्षी पुनर्मुद्रित झालें आहे.

ह्याशिवाय प्रथमच प्रसिद्ध झालेल्या अशा कांही कादंबऱ्यांची नांवें वरील विवेचनांत आलेलीं नसण्याचा संभव आहे. तो अनुल्लेख हेतुपुरस्सर झाला असें समजूं नये.

वा. ल. कुळकर्णी

## लघुकथा

वाढत्या महर्घतेने लघुकथांच्या प्रकाशनावरहि परिणाम झालेला दिसतो; स्वरूपावर मात्र नाही. तेच सुशिक्षित पांढरपेशे लेखक आणि तेंच मध्यमवर्गीयांचें जीवन पुनः या सालच्या लघुकथांत दिसतें. कांही लेखकांना मात्र याची जाणीव झालेली दिसते व आपल्या परीने चाकोरीबाहेर जाण्याचा प्रयत्न ते करीत आहेत.

प्रा. फडके याचे दोन कथासंग्रह या कालांत प्रकाशित झाले (१ वत्सला आणि अि॰ २ चंद्रा आणि अि.). यांतील कांही कथा पूर्वी वाचकांच्या वाचनांत आल्या असल्या तरी त्या अेकत्रित स्वरूपांतहि आपल्या सफाअीदार तंत्राने आणि लालित्यपूर्ण भाषेने वाचकांस आकर्षित करीत आहेत. काणेकरांची 'काळी मेहुणी' जरी रंगाने काळीसांवळी असली, तरी अेकंदरींत ठसठशीत आणि नीटनेटकी आहे. कांही रूपान्तरित कथांमधील मालमसाला प्रख्यात विदेशी लेखकांच्याकडून घेतल्याने त्या चित्तवेधक वाटल्या, तरी या संग्रहांमधील स्वतंत्र कथाच अधिक सरस आहेत. सुशिक्षित मध्यमवर्गाच्या बाहेरच्या व्यक्तींचें जीवन यांत चित्रित केलें आहे. काणेकरांच्या 'दिव्याखाली अंधेर' या कथासंग्रहांतील सामान्य समाजाचा साक्षात्कार या संग्रहांत दिसत नसला, तरी 'काळी मेहुणी' ही अविस्मरणीय आहे. यांतील कांही कथांमधील विनोद निर्मळ नसला तरी सहृदय आहे.

प्रा. गोरे यांनी आपल्या लघुकथेची दृष्टि चाकोरीबाहेरच्या जगाकडे वळविली आहे. 'विजेचा पाळणा', 'चंपल स्टोअर्स'सारख्या प्रेमकथांमधील प्रेमाच्या छटाहि ठराविक ठशाच्या नाहीत. मनुष्येतर प्राण्यांकडे लघुकथालेखकाने आपलें लक्ष वळविल्याचें स्वागतार्ह अुदाहरण 'मांजरीचीं पिलें' या कथेंत दिसून येअील. श्री. मायनेकरांनी आपल्या 'झांजर' या कथासंग्रहांत यावाबत आणखी अेक पाअूल पुढे टाकलें आहे. या संग्रहांत अेकहि प्रेमकथा नाही. बदलत्या काळांत आढळणारा नव्याजुन्यांचा झगडा, समाजांतील सर्व दुःखांचें मूळ म्हणजे आर्थिक विषमता, अित्यादि विषय प्रस्तुत संग्रहांत प्रामुख्याने आढळतात. जीवनासंबंधीचा वास्तववादी दृष्टिकोन व जिव्हाळा आणि लेखनांतील अकृत्रिमता या गोष्टींनी श्री. मायनेकरांच्या लघुकथांबद्दल वाचकांच्या मनांत आशा अुत्पन्न करून ठेवली आहे.

या सालच्या लघुकथालेखिकांत कै. आनंदीबाई किर्लोस्करांच्या 'अंतरंग' या संग्रहाने फारच वरचें स्थान मिळविलें आहे. स्त्रीजीवनाचें मर्म जाणणारी व सूक्ष्म सामाजिक दृष्टि असणारी अेक अुत्कृष्ट कथालेखिका असें त्यांचें वर्णन यथार्थतेने करतां येअील. त्यांचें लक्ष मध्यमवर्गीय स्त्रियांअितकेंच मोलमजुरी करणाऱ्या बायांबापड्यांकडेहि जातें, व केवळ समाजाच्या अंतरंगाचें चित्रण करून न थांबतां त्यामागील विशिष्ट कारणपरंपरेकडेहि त्या लक्ष पुरवितात. सौ. वसुमती धारकर यांनी आपल्या 'चाकोरीबाहेर' या कथासंग्रहांत स्त्रियांनी चाकोरीबाहेर पडण्याची आवश्यकता व स्वतंत्र होण्यासाठी करावयाची बंडखोरी प्रतिपादिली आहे. मार्मिक वर्णनें आणि शुद्ध मराठी भाषा यांमुळे प्रस्तुत संग्रहांतील कथा हृदयंगम वाटल्या, तरी लेखिकेच्या नवाशिकेपणामुळे आणि अेका विशिष्ट मताच्या आहारीं गेल्याने त्यांत कांहींशी अस्वाभाविकता आली आहे. कमल दीक्षित यांच्या 'मकरंदा'मधील कथा वरील दृष्टीने लिहिल्या नसल्या, तरी कथानकाची गुंफण व खेळकर भाषाशैली यांमुळे त्या चटकदार अुतरल्या आहेत.

या वर्षीच्या विनोदकथालेखकांत शामराव ओक, कॅप्टन लिमये व वि. मा. दी. पटवर्धन या परिचित लेखकांचींच नांवें दिसतात. ओकांनी आपल्या 'मालगाडीं'त प्रचलित नीतिअनीति, पांढरपेशांची संकुचित वृत्ति, तकलुपी कलावंतांचा बाजारभाव अित्यादि अनेक गोष्टींचा अुपहासपूर्वक समाचार घेतला आहे. 'अुपरतीचा क्षण' ही या संग्रहांतील अुत्कृष्ट कथा आहे. व्यक्तीपेक्षा वृत्तीवर शस्त्र धरणें हा ओकांचा विशेष असला तरी प्रसंग आल्यास व्यक्तीचा मुलाहिजा ते ठेवीत नाहीत. पटवर्धनांचा जीवा हा तिंबूनाना, पांडुतात्या यांचा भाअीबंद सामाजिक दोषांबरोबर गुणांवरहि शस्त्र धरतो. मधून मधून येणारी अतिशयोक्ति सोडल्यास आधुनिक सामाजिक जीवनाचें अुपरोध-अुपहासद्वारा केलेलें दर्शन बरेंच मनोरंजक व अुद्बोधक झालें आहे. कॅप्टन लिमयांच्या 'गोपाळकाल्यांत'हि स्वभावनिष्ठ विनोदाचे अनेक मासले आहेत. त्यांच्या प्रहसनवजा पांच विनोदी लेखांमध्ये 'पंत औषधास जातात' ही कथा फार बहारदार वठली आहे.

'संध्यांचा बाग', 'चोरटीं चुंबनें' यांसारख्या प्रेमाची कल्पनारम्य सृष्टि रंगविणारे कथासंग्रहहि या कालांत झाले आहेत. वास्तवजीवनाच्या दृष्टीने त्यांस फारसें महत्त्व नाही. गेल्या वर्षाच्या समालोचनांत म्हटल्याप्रमाणेच याहि वर्षी म्हणावें लागतें की खरी डोळस समाजाभिमुख अशी दृष्टि असल्याखेरीज कथावाङ्मय अधिक अुच्च दर्जाचें निपजणार नाही. जुन्या कथालेखकांच्या अनुभवाच्या मर्यादा आता निश्चित झाल्या आहेत व त्यांच्या प्रतिभेची कमाल भरारी आता परिचित झाली आहे. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट अितकीच की त्यांनाहि 'जागृतीचीं स्वप्नें' पडूं लागलीं आहेत. प्रा. फडक्यांच्या कथांतून याची साक्ष मधून मधून आढळते. पण यापुढील खरी मदार नव्या लेखकांवरच आहे. वास्तव मानवी जीवनाचा जिव्हाळा, त्या जीवनामागे असणाऱ्या तत्त्वज्ञानाबद्दलची डोळस दृष्टि व तीमुळे येणारी अनुभूति यांचा संगम नवीन कथालेखकांत झाला तरच लघुकथावाङ्मयास अधिक अुजळा मिळण्याचा संभव आहे. सौ. आनंदीबाई किर्लोस्करांच्या अकालीं मृत्युमुळे अशी अेक लेखिका नाहीशी झाली ही दुःखाची गोष्ट आहे.

गं. ब. ग्रामोपाध्ये

## लघुनिबंध

गेल्या वर्षात लघुनिबंधांचे जे संग्रह प्रसिद्ध झाले ते 'मंदाकिनी', 'पाला-पाचोळा', 'चलतीं नाणीं' आणि 'धूम्रतरंग' हे होत. 'पाला-पाचोळ्या'चे लेखक श्री. तात्यासाहेब

केळकर व 'धूम्रतरंगा'चे श्री. मा. का. देशपांडे हे या प्रांतांत नव्यानेच पाऊल टाकतांना दिसतात. श्री. देशपांडे यांसारख्या नवोदित तरुण लेखकाने या प्रदेशांत प्रवेश करण्याचें मनांत आणावें यांत नवल असें कांही नाही. पण आपल्या वयाच्या सत्तरींत श्री. तात्यासाहेब केळकरांनी या लेखनप्रकारांत मुलुखगिरी करण्यास सरसावावें हें दोन तीन दृष्टींनी महत्त्वाचें आहे. अेक तर लघुनिबंधाचें आकर्षण व प्रभावशीलता हीं दिवसेंदिवस लोकांना पटूं लागलीं आहेत हें यावरून स्पष्ट होतें. दुसरें असें की आपल्या संपन्न व्यक्तिमत्त्वाचें सुरस प्रकटीकरण लघुनिबंधप्रकाराअितकें दुसऱ्या वाङ्मयप्रकाराने क्वचितच होतें हें होय. कदाचित् याच कारणाने आपलें आत्मचरित्र लिहिण्याअैवजी 'स्मृतीलहरीं'सारखें स्फुट लघुनिबंधात्मक पुस्तक लिहिण्याची जरूरी श्री. वामनराव जोश्यांना अखेरीस वाटली असावी.

आतापर्यंत लघुनिबंधप्रांतांत जीं तीन वळणें ठळकपणें दिसत होतीं, त्यांत या लेखकांच्या लेखनसामर्थ्यानें आणखी अेकदोन वळणांची भर पडेल असें स्पष्ट दिसत आहे. त्यांतल्या त्यांत खांडेकरी वळण आणि फडके वळण हीं दोन्ही अनुकरणाला सोपीं आणि सोयिस्कर असतां आणि पुष्कळसें लेखन त्याच वळणावर होत असतां दोन नवीन वळणें पडण्याचें चिन्ह दिसूं लागावें ही गोष्ट खचित अुत्साहजनक होय.

कोणत्याहि वाङ्मयप्रकारांत नव्या पाअुलवाटा मळण्याचें काम संपन्न आणि अधिकारी व्यक्तिमत्त्वाशिवाय साध्य होत नाही. लघुनिबंधप्रकारांत तर हा नियम विशेषार्थाने रूढ आहे. लघुनिबंधलेखनास नवीन वळण घालून देण्यास त्यामागे तितकेंच प्रभावी व्यक्तिमत्त्व हवें. तसें तें श्री. तात्यासाहेब केळकरांजवळ आहे हें खचित. त्यांनी या नवप्रकारांत लेखन करून त्याला संपन्नता आणावी अशा तऱ्हेच्या सूचना त्यांना आतापर्यंत अनेकांनी केल्या. त्यांना मान देण्याकरिताच कीं काय त्यांनी आपला 'मिडास राजाचा हस्तस्पर्श' या वाङ्मयप्रकारास करण्याचें ठरविलें आहे असें दिसतें.

तात्यासाहेबांचा चौफेर अनुभव, त्यांचें बहुश्रुतत्व, त्यांची तीव्र संवेदनाशक्ति, कोणताहि विषय सुगम करून त्याला अगदी घरगुती स्वरूप देण्याची हातोटी वगैरे गुण त्यांच्या 'पालापाचोळ्यां'त दिसत असले तरी सूक्ष्म संवेदनांचें रसग्रहण करण्यापेक्षा त्यांची तात्त्विक बाजूच पाहण्याच्या त्यांच्या वृत्तीमुळे त्यांचे बहुतेक लघुनिबंध रूक्ष, नीरस व पाल्हाळपूर्ण अुतरले आहेत. मिडास राजाचा स्पर्श होतांच वस्तूंचें सुवर्ण होअी हें खरें, पण सुवर्ण होतांना त्यांतला जिवंतपणा हरपे हेंहि खरें ! तसेंच कांहीसें येथें झालें आहे.

श्री. र. गो. सरदेसाअी यांनी आपल्या 'कागदी विमानां'त जें वळण दाखविलें तेंच 'चलतीं नाणीं' या संग्रहांत निश्चित केल्याचें दिसतें. श्री. सरदेसाअी यांचा वृत्तपत्रव्यवसायाशीं दृढ आणि दीर्घ परिचय आहे, तेव्हा त्याचे दाट संस्कार त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर झाले असल्यास नवल नाही. परंतु वर्तमानपत्रांच्या जीवनांत जी रसात्मकता, जें सौंदर्य, जो विनोद आढळतो तो शोधून घेण्याअितकें त्यांचें व्यक्तिमत्त्व रसिक आणि जीवनलोलुप आहे याची साक्ष त्यांच्या निबंधांत पदोपदीं पटते. लघुनिबंधास लागणारा मालमसाला वर्तमानपत्री जगांत विपुल विखुरलेला आढळतो. त्याचें संकलन आणि परिवर्तन करणारें व्यक्तिमत्त्व हवें, तें श्री. सरदेसायांच्या ठिकाणीं आहे ही आनंदाची गोष्ट होय.

वर्तमानपत्रांच्या संसर्गाने लघुनिबंधलेखन डागाळेल अशी भीति श्री. खांडेकरांनी व्यक्त केली आहे. पण श्री. सरदेसायांचे हे दोन संग्रह, तसेंच इंग्रजींतील गार्डिनर, लिंड, प्रीस्टले अित्यादिकांचें लेखन पाहिलें तर ही भीति निराधार असल्याचें आढळून येअील. वर्तमानपत्र-

व्यवसायांत आत्मीयतेने पडणारांना जीवनाचा अनुभव जितक्या तीव्रतेने व विविधतेने येत असेल तितका तो अितरांना येणें अशक्य; तेव्हा या जीवनाचा अनुभव ज्यांनी घेतला व ज्यांनी त्याचे ठसे आपल्या लेखनावर अुठविले त्यांच्या लेखनांत जिव्हाळा आणि जिवंतपणा रसरसलेला दिसावा, त्यांत दैनंदिन घडामोडींतला ताजेपणा आणि विनोद प्रकट व्हावा, यांत नवल कसलें? आजच्या घटकेला लघुनिबंधलेखनास केवळ बैठें वाङ्मयीन स्वरूप प्राप्त होअील कीं काय अशी भीति वाटत आहे, अशा वेळीं वर्तमानपत्रांच्या संसर्गाने लघुनिबंधास नवीन जिवंत वळण लावण्याचें श्रेय श्री. सरदेसाअी यांनी संपादन केलें ही अभिनंदनीय गोष्ट होय.

श्री. मा. का. देशपांडे यांच्या लघुनिबंधाला अजून निश्चित असें स्वरूप प्राप्त व्हावयाचें आहे. त्यांच्या पुष्कळशा लघुनिबंधांचीं स्फूर्तिस्थानें बाहेर कोठे तरी आहेत असें वाटतें. प्रो. फडके यांच्या वळणावर आपलें लेखन न्यावयाचें असा त्यांचा हेतुपुरस्सर प्रयत्न ठिकठिकाणीं दिसतो. तरी त्यांतूनहि त्यांचें कांही अेक वैशिष्ट्य निर्माण होअील अशीं चिन्हें या संग्रहांत दिसतात.

श्री. खांडेकर यांच्या 'मंदाकिनीं'तील 'कनकारविंदां'ना भावनेचा मधुर सुगंध येत असल्याची ग्वाही या संग्रहांतील कांही लघुनिबंध खचित देतील.

अेकंदरींत नवनवीन लेखक आकृष्ट करून घेण्याअितकी प्रभावसंपन्नता मराठी लघुनिबंधांत अुत्पन्न होत आहे आणि हे नवीन लेखक आपल्या व्यक्तिवैशिष्ट्याने लघुनिबंधलेखनाला वैभव आणि संपन्नता आणीत आहेत. श्री. सरदेसाई यांनी लघुनिबंधाला जें नवीन वळण लावलें आहे तें या लेखनप्रकाराच्या अुत्कर्षाला अुपकारकच होईल अशी आशा वाटते.

ना. मा. सन्त

---

## निजामप्रांतीय मराठी साहित्य संमेलन (अधिवेशन २ रें)

हें संमेलन नांदेड येथे २८-२९-३० सप्टेंबरला प्रा. प्रोतदार यांच्या अध्यक्षतेखाली भरलें. नांदेड हा टापू मराठवाड्यांत मध्यवर्ती असल्याने चोहींकडून बरेच साहित्यभक्त जमले होते. पांच वर्षांपूर्वी भरलेल्या पहिल्या अधिवेशनानंतर शासनसंस्थेच्या अनुमतिविना २ रें अधिवेशन अितके दिवस होअूं शकलें नाही. नांदेडकर कार्यकर्त्या बांधवांची चिकाटी व प्रयत्न यांना यश येअून नियोजित स्थळीं व नियोजित अध्यक्षांच्या नेतृत्वाखालीच संमेलन भरविण्याची अनुमति मिळाल्याने सर्वत्र अुत्साह होता. परगांवचे पाहुणे ४१५ शें पर्यंत व अेकंदर समुदाय दीडदोन हजारांपर्यंत होता. साहित्यप्रेमी भगिनीवर्गाचें साहाय्यहि संमेलनास लाभलें होतें. ठरावांमध्ये 'मराठी मातृभाषेच्या माध्यमाची मागणी' हा ठराव अुल्लेखनीय असा झाला. पुढील वर्षांत ठरावांची अंमलबजावणी व अितर विधायक कार्य करण्यासाठी जिल्हावार प्रतिनिधि निवडून अेक तात्पुरती समिति नेमण्यांत आली व तिचें नांदेड हें स्थळ मान्य करण्यांत आलें. मराठवाड्यांतील पुढील लेखकांच्या ग्रंथांचें प्रकाशन झालें. सौ. लक्ष्मीबाअी लेले, हैदराबाद– नीरांजन– काव्यसंग्रह, डॉ. पुरबार (औरंगाबाद)– विराट् मानव– काव्य, श्री. पोहनेरकर– दोन पोवाडे, श्री. कृष्णाकुमार– भिलिंगदेशाची दैनंदिनी, खरशीकरशास्त्रीसंपादित–

केशवस्वामींची कविता. हस्तलिखित मासिकांचें अेक प्रदर्शन संमेलनाबरोबर भरविण्यांत आलें होतें. प्रदर्शनविभागांत श्री. कानोले यांचा हस्तलिखितांचा प्रचंड संग्रह ठेवण्यांत आला होता कानोले यांचा संग्रह आणि संपादनाची तळमळ वाखाणण्याजोगी आहे. साहित्यिकांच्या सत्कारार्थ मराठीच्या अेका हितचिंतकाने दिलेले ५० रु. श्री. कानोले, श्री. पोहनेरकर, श्री. वांगीकर आणि श्री. लाटकर यांत वाटून देण्यांत आले. श्री सो. चौधरी, वांगीकर, पोहनेरकर यांचें काव्यगायनहि झालें. अेकूण सोळा ठरावांत निर्बंधदूरीकरण, नभोवाणी खात्यास विनंती, मातृभाषामाध्यम, लिपिसुधारणा, अितिहाससंशोधन, प्रादेशिक वाङ्मयनिर्मिति अित्यादि ठराव महत्त्वाचे होते. संमेलनास पुढच्या वर्षीचें आमंत्रण औरंगाबादचें आलें आहे.

---

# बृहन्महाराष्ट्रीय साहित्यवार्ता

अिंदूर— २९-७-४३ या दिवशीं वा. म. जोशी यांच्या निधनानिमित्त दुःखप्रदर्शनासाठी अिंदूर येथील पंधरा महाराष्ट्रीय संस्थांच्या वतीने सभा भरली होती. अध्यक्षस्थानीं श्रीमंत सरदार किबे होते. रा. टाकूर, दिघे वकील, डॉ. करंदीकर, श्री. अूर्ध्वरेषे, रा. अुपासनी व श्री. कवीश्वर अित्यादिकांचीं भाषणें झालीं. ता. १ ऑगस्टला साहित्यसभेने प्राज्ञ व विशारद या परीक्षांचे वर्ग सुरू केले. ता. १५-८-४३ पासून साहित्यसभेतर्फे अेक पाक्षिक व्याख्यानमाला गुंफली जात आहे. त्यांत अुज्जैन येथील प्राध्यापक माचवे यांचें "चीन व हिंदुस्थान यांचें सांस्कृतिक अैक्य" यावर, डॉ. करंदीकर यांचें "अद्भुत व मराठी वाङ्मय" यावर, प्रा. श्री. म. माटे यांचीं "दक्षिणेंतील दिल्ली दरवाजे" व "संतवाङ्मयाचा संदेश" यांवर, श्री. शिराळकर यांचें "बालचरपद्धतीचें तात्त्विक स्वरूप" यावर, श्री. माकोडे यांचें "महाराष्ट्र युनिव्हर्सिटी" या विषयावर व मुंबअीचे प्रि. ज. रा. घारपुरे यांचें "वारसाहक्काचा कायदा" यावर अित्यादि व्याख्यानें झालीं. साहित्यसभेकडून येत्या कार्तिकी पौर्णिमेस वा. गो. आपटे ट्रस्टकडून मिळालेल्या रु. ५०० च्या देणगींतून त्यांचे नांवें अेक बालवाचनालय अुघडण्यांत येणार आहे. १९४३ चें "पंत-वैद्य पारितोषिक" (रु.१००) आगाअू प्रसिद्धिल्याप्रमाणे गेल्या तीन वर्षातील प्रकाशित किंवा अप्रकाशित नाटकांपैकी परीक्षणार्थ आलेल्या नाटकांत सर्वोत्तम ठरेल त्या नाटकास देण्यांत येणार आहे. त्याचा निर्णय नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत प्रकट होअील सांगली येथील नाट्यमहोत्सवांतहि तो प्रकट करण्याची व्यवस्था होअील. कवि श्री. काळेले यांच्या "भावपूर्णा" नांवाच्या तृतीय कवितासंग्रहाचा प्रकाशन समारंभ (१०-१०-४३) न्या. मू. रेगे यांच्या अध्यक्षतेने झाला. याव्यतिरिक्त प्रतिमा-मंडळ या संस्थेने प्रा. माचवे यांचें "युद्ध व वाङ्मय" यावर व्याख्यान करविलें. त्याच मंडळाने श्री. काळेले यांच्या काव्यावर अेक चर्चा घडवून आणिली.

प्रा. श्री. म. माटे यांचीं येथील गणेशोत्सवाचे वेळीं होळकर कॉलेजांत "मानसशास्त्रज्ञांना विचारा", खिश्चन कॉलेजांत "भावावृद्धीचें सामाजिक स्वरूप" यांवर व्याख्यानें झालीं. त्यांव्यतिरिक्त त्यांचीं भाषणें सामाजिक विषयांवर अितर ठिकाणीं झालीं. त्यांनी अुज्जैन, रतलाम व कोटा येथेहि व्याख्यानें दिलीं.

ग्वाल्हेर— येथे नाट्यमहोत्सवानिमित्त मराठी नाट्यवाङ्मयावर नामांकित व अधिकारी

लेखकांकडून ग्रंथ लिहविला जात आहे. त्याचप्रमाणे या महोत्सवानिमित्त निबंध, व्याख्यानें व चर्चा नोव्हेंबरमध्ये होतील. विक्रमशताब्दानिमित्त शिंदे सरकारतर्फे विक्रमविश्वविद्यालय स्थापन होण्याचें घाटत आहे. त्याचा समारंभ मार्चमध्ये होईल. विक्रमसंस्मरणानिमित्त प्राच्यवाङ्मय-मंदिर, प्राच्यचित्रमंदिर व विश्वविद्यालयस्थापना अुज्जैन येथे होणार आहे. त्यानिमित्त नामांकित अितिहासज्ञांकडून अेक स्मारक-ग्रंथहि लिहविला जाणार आहे. रा. ब. मुळ्ये, श्री. दाणी, डॉ. दिवेकर व अितर पुष्कळच मंडळी यासाठी अविरत खटपट करीत आहेत.

म. अ. करंदीकर

---

# मराठवाड्यांतील साहित्यवार्ता

## मराठी मंडळ, हैदराबाद (द.)

आज तीन वर्षांपासून हैदराबाद शहरीं प्रस्तुत मंडळाने प्राज्ञ आणि विशारद परीक्षांचे वर्ग यशस्वी रीतीने चालविले आहेत. याहि वर्षी हे वर्ग तीन निरानिराळ्या ठिकाणीं चालविले जात आहेत आणि चाळीसपर्यंत विद्यार्थी साहित्याचा अभ्यास करीत आहेत. मराठी मंडळाच्या विनंतीस मान देअून मराठवाड्यांत, आंबे जोगाअी, औरंगाबाद, परभणी, अुस्मानाबाद, हिंगोली, नांदेड अित्यादि ठिकाणींहि या अभ्यासाचीं केंद्रें अुघडलीं आहेत.

हैदराबादीं येणाऱ्या साहित्यिकांचा सत्कार आणि वर्गास भेट हेहि कार्यक्रम मंडळाकडून होत असतात. गेल्या तिमाहींत प्रा. आंबेकर, प्रा. ओतूरकर, प्रा. पोतदार आणि राजकवि यशवंत यांच्या सत्कारांचे कार्यक्रम झाले. राजकवि यशवंत यांचा सत्कारसमारंभ येथील बऱ्याचशा वाङ्मयीन संस्थांच्या सहकार्याने प्रातिनिधिक स्वरूपांत राजा प्रतापगीरजी बहादुर यांच्या भव्य दिवाणखान्यांत करण्यांत येअून त्यांना मानपत्रहि समर्पण करण्यांत आलें.

निबंधवाचन आणि चर्चा हाहि मंडळाचा मासिक कार्यक्रम असतो. चालू वर्षी आतापर्यंत श्री. दिवाकरकृष्णांचा 'मराठी साहित्याची आर्थिक बाजू', श्री. देशमुख यांचा 'कै. वा. म. जोशी– व्यक्ति आणि वाङ्मय', श्री. फाटक (संपा. निजामविजय) यांचा 'मराठींतील वृत्तपत्रांचें जीवन' असे माहितीपूर्ण निबंध वाचले आणि चर्चिले गेले.

## शारदोपासक मंडळ, हैदराबाद (द.)

येथील शारदोपासक मंडळाकडून शारदोत्सवानिमित्त तीन दिवसांचा कार्यक्रम करण्यांत आला. त्यांत सहा लघुव्याख्यानें आणि एक चर्चेचाहि कार्यक्रम झाला. श्री. र. मु. जोशी यांचें 'साहित्य आणि प्रेम' या विषयावर श्रवणीय भाषण झालें. चर्चेचा विषय 'पुरोगामी वाङ्मयाची प्रथा नवीन आहे काय?' असा होता.

## हिंदी भाषेंत पोवाडा, नांदेड

गेल्या साहित्यसंमेलनांत जमलेल्या नामवंत कविबंधूंत श्री. पोहनेरकर यांनी येथील गुरुद्वारा या शीख मंदिरांत श्रीगुरु गोविंदसिंह यांच्या जीवनचरित्रावर हिंदी भाषेंत पोवाडा रचून गाअून दाखविला. हिंदी भाषेंत रचलेला हा पहिलाच पोवाडा येथील शीख बांधवांस चांगलाच आवडला.

न. शे. पोहनेरकर

---

# नियामक मंडळाची विशेष सभा

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची विशेष सभा ता. ३ आक्टोबर १९४३, रविवारीं, सायंकाळीं ६॥ वाजतां 'डॉ. माधवराव पटवर्धन साहित्य मंदिरां'त परिषदेचे अुपाध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. सभेस पुढील सभासद अुपस्थित होते :— १ प्रा. द. वा. पोतदार, २ प्रि. ध. रा. गाडगीळ, ३ श्री. कृ. ग. लिमये, ४ प्रा. दे. द. वाडेकर, ५ श्री. चिं. ग. कर्वे, ६ डॉ. न. का. घारपुरे, ७ डॉ. रा. ग. हर्पे, ८ प्रा. श्री. रा. पारसनीस, ९ श्री. बा. शि. नाअीक, १० श्री. के. नारायण काळे, ११ प्रा. रा. श्री. जोग, १२ श्री. गं. मा. निरंतर, १३ श्री. वा. दा. गोखले.

सभेचें काम सुरू होतांच म. सा. परिषदेच्या अध्यक्षांची निवडणूक या सभेस करतां येते किंवा नाही, अगर ती साधारण सभेस करावी लागेल, असा प्रश्न निघाला. त्यावर अध्यक्षांनी आजची सभा घटना नियम ९७ प्रमाणे बोलाविली आहे असें वाटतें असा खुलासा केला. श्री. कर्वे, प्रा. वाडेकर, प्रा. पारसनीस, डॉ. घारपुरे, श्री. काळे, प्रि. गाडगीळ अित्यादि सभासदांनी या प्रश्नाबद्दल बरीच चर्चा केली. साधारण सभा ही कांहीं निराळी बॉडी (मंडळ) होत नाही व साधारण सभेच्या बैठकींत निवडणुकी होत नाहीत अित्यादि मुद्दे मांडण्यांत आले व नियम चौदाकडे लक्ष देअून चर्चा करण्यांत आली. अठ्ठाविसावा नियमहि विचारांत घेण्यांत आला. अध्यक्षांनी विचारल्यावरून आजच्या कार्यपत्रिकेवरील निवडणुकीच्या बाबतींत कोणाहि सभासदाकडून तक्रार अगर आक्षेप आला नाहीं असें चिटणिसांनी सांगितलें. येणेंप्रमाणे साधक-बाधक चर्चा झाल्यावर सभासदांकडून व्यक्त करण्यांत आलेले अभिप्राय व दाखले यांचा विचार करतां आजच्या कार्यपत्रिकेवरील निवडणुकीचें काम या सभेस करतां येअील असा निर्णय अध्यक्षांनी दिला.

यानंतर रा. बापूराव नाअीक यांच्या सूचनेवरून कार्याध्यक्षांच्या राजीनाम्याचा (आ. क्र. १४७) विचार आधी करावा असें सर्वानुमतें ठरलें. त्यावर चिटणिसांनी रा.सा. र. लु. जोशी यांचें राजीनाम्याचें पत्र वाचलें. व त्याबद्दलची हकिकत व पत्रव्यवहार अित्यादि बाबतची माहिती सभेस दिली. यावर प्रा. वाडेकर यांनी राजीनामा मंजूर करण्याबद्दल सूचना केली व श्री. कर्वे यांनी अनुमोदन दिलें. रा.सा. जोशी यांचा राजीनामा मंजूर करावा असें सर्वानुमतें ठरलें. यानंतर प्रा. वाडेकर यांनी ठराव मांडला की रा. सा. जोशी यांचे आभार मानण्यांत यावे आणि आभाराचा ठराव करण्याचा अधिकार अध्यक्ष व चिटणीस यांजकडे देण्यांत यावा. अध्यक्ष व चिटणीस यांजकडून तयार करण्यांत आलेला ठराव येणेंप्रमाणे :—

"रा. सा. र. लु. जोशी यांनी स्थलान्तरामुळे आणि प्रकृतीच्या अस्वास्थ्यास्तव कार्याध्यक्षपदाचा त्याग करण्याचा मनोदय कळविला. रावसाहेब जोशी यांनी कळविलेल्या अडचणी लक्षांत घेतां त्यांचें त्यागपत्र खेदपूर्वक स्वीकारणें या सभेस प्राप्त आहे. रा.सा. जोशी यांनी अलिकडे कित्येक वर्षें म. सा. परिषदेचे चिटणीस या नात्याने अत्यंत कष्ट-मेहेनत घेअून परिषदेची जी बहुमूल्य सेवा केली, प्रचारार्थ अुतार वयांत दगदग सोसून संचार केला, आणि परिषद् भरभराटीस यावी यास्तव श्रमसायास केले, त्यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण या वेळीं करणें

समेस आवश्यक वाटतें. ते सांप्रत दूर असले तरी त्यांचा मनोभावें करून पाठिंबा पुढील चालकांस सतत मिळत राहील अशी अुमेद ही सभा व्यक्त करीत आहे."

हा टराव सर्वानुमतें संमत करण्यांत आला.

यानंतर कै. वा. म. जोशी, अध्यक्ष, म. सा. परिषद् यांच्या मृत्यूने रिकाम्या झालेल्या जागेसाठी पुढीलप्रमाणे नावें क्रमवार सुचविण्यांत आलीं :—

१ म. म. पांडुरंग वामन काणे (सू. प्रि. गाडगीळ, अनु. डॉ. हर्षे); २ श्री. ना. गो. चापेकर (सू. प्रा. वाडेकर, अनु. श्री. कर्वे); ३ प्रा. द. वा. पोतदार (सू. श्री. नाअीक, अनु. श्री. गोखले). या प्रकरणीं अेकमत झाल्यास पाहावें अशी सूचना आल्यावरून अध्यक्षांनी सभेचें काम दहा मिनिटें तहकूब केलें. अेकमत होत नाही असें सूचकांनी कळविलें तेव्हा प्रि. गाडगीळ यांनी म. म. काणे यांच्या नांवाची सूचना परत घेतली. नंतर अुरलेल्या दोन नांवांवर लेखी मतें घेण्यांत आलीं तेव्हा श्री. चापेकर यांस सहा व प्रा. पोतदार यांस सहा येणेंप्रमाणे समसमान मतें पडलीं. त्यानंतर चिठ्ठ्या टाकून निर्णय करावा असें ठरलें. आणि प्रा. पोतदार यांच्या नांवाची चिठी निघाल्याने ते अध्यक्ष निवडून आल्याचें अध्यक्षांनी जाहीर केलें.

यानंतर श्री. नाअीक यांनी कार्याध्यक्षांच्या जागेसाठी श्री. कृ. ग. लिमये यांचें नांव सुचविलें. श्री. निरंतर यांनी अनुमोदन दिल्यानंतर ही सूचना सर्वानुमतें मान्य करण्यांत आली.

यानंतर नियामक मंडळांतील प्रतिनिधि श्री. दे. ल. महाजन यांच्या रिकाम्या जागीं अध्यक्षांच्या सूचनेवरून रा. वि. गो. कर्वे यांची निवडणूक सर्वानुमतें करण्यात आली. येणेंप्रमाणे कामें झाल्यानंतर अध्यक्षांचे आभार मानण्यांत येअून सभेचें काम समाप्त झालें.

---

# परिषद्वार्ता

(चिटणिसांकडून)

मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर कार्यकारी मंडळाच्या ता. ५ सप्टेंबर, ३ ऑक्टोबर, व १९ ऑक्टोबर या दिवशीं सभा भरविण्यांत आल्या.

ता. ५ सप्टेंबरच्या सभेंत खालील कामें झालीं :—

(१) कै. दि. ब. कृ. ल. पावणसकर, अजमीर, (२) कै. नारायण महादेव बाक्रे, मुंबई, व (३) कै. के. ल. टेंमुर्णीकर, अहमदनगर, यांजविषयी दुखवटा.

परिषदेचे अध्यक्ष कै. प्रा. वामन मल्हार जोशी यांच्या मृत्यूमुळे नवीन अध्यक्षांच्या निवडणुकीसाठी व कार्याध्यक्ष रावसा. र. लु. जोशी यांच्या राजीनाम्याचा विचार करण्यासाठी ता. ३ आक्टोबर दिवशीं नियामक मंडळाची विशेष सभा घ्यावी असें ठरलें.

नभोवाणीच्या कार्यक्रमांत मराठी भाषेस जास्त वाव मिळावा याबद्दलचा विचार करून वृत्तान्त तयार करण्यासाठी (१) श्री. कृ. ग. लिमये, (२) प्रा. रा. श्री. जोग, (३) डॉ. न. का. घारपुरे (आमंत्रक) याची समिति नेमण्यांत आली. केवळ शैक्षणिक संस्था परिषदेशीं कोणत्या नात्याने जोडून घेतां येतील याबाबतचा विचार करून शिफारशी करण्यासाठीं (१) प्रि.

ध. रा. गाडगीळ, (२) श्री. कृ. ग. लिमये, (३) श्री. वि. द. घाटे, व (४) प्रा. श्री. रा. पारसनीस (आमंत्रक) यांची समिति नेमण्यांत आली.

वाङ्मयसेवामंडळ, धुळें, या संस्थेस संलग्न करून घेण्याचें ठरलें.

श्री. ग. गं. जांभेकर यांनी परिषदेच्या वाचनालयासाठी दोन लाकडी नियतकालिक-दर्शिका (shelves) दिल्याबद्दल त्यांचा साभार स्वीकार करण्यांत आला.

ता. ३ आक्टोबरच्या सभेंत सांगली संमेलनासाठी परिषदेतर्फे पाठवावयाच्या ठरावांचा मसुदा तयार करण्यासाठी (१) श्री. कृ. ग. लिमये, (२) प्रि. ध. रा. गाडगीळ, (३) प्रा. रा. श्री. जोग, (४) श्री. वि. द. घाटे, व (५) श्री. के. नारायण काळे यांची उपसमिति नेमण्यांत आली.

ता. १९ ऑक्टोबरच्या सभेंत खालील कामें झालीं:—

कै. रामानंद चतर्जी व श्री. शं. पु. जोशी यांजबद्दल दुखवटा.

देशी मापांच्या अुन्नतिप्रीत्यर्थ व प्रगतीसाठी कांही खटपट व्हावी असा ठराव मुंबअी विद्यापीठाच्या नियामक मंडळाने केला असून त्याबाबतची योजना करण्यासाठी अेक समितीहि नेमली गेली आहे. या समितीच्या कार्यात मदत म्हणून परिषदेस कांही शिफारशी करावयाच्या असल्यास त्या करण्याबद्दल मुंबअी विद्यापीठाकडून लिहून आल्यावरून ह्या पत्रास अनुलक्षून परिषदेतर्फे कांही शिफारशी वगैरे पाठविणें झाल्यास त्याबद्दलच्या पूर्वविचारासाठी (१) प्रि. ध. रा. गाडगीळ, (२) श्री. वि. द. घाटे, व (३) प्रा. रा. श्री. जोग यांची अुपसमिति नेमण्यांत आली.

सांगली संमेलनास पाठवावयाच्या ठरावांचा मसुदा पक्का करण्यांत आला.

महाराष्ट्र विद्यापीठ समितीने केलेल्या शिफारशी लक्षांत घेअून परिषदेस कांही सूचना करावयाच्या असल्यास त्या करण्याबद्दल मुंबअी सरकारकडील पत्र सभेपुढे विचारार्थ मांडण्यांत आलें. यासाठीं कार्यकारी मंडळाची अेक स्वतंत्र सभा घेअूनच या विषयाचा विचार व्हावा असें ठरलें. सभासदांकडूनहि मतें मागवावीं असें ठरलें.

कार्यकारी मंडळांतील रिकाम्या जागीं सौ. आनंदीबाअी शिर्के यांची सर्वानुमतें निवड करण्यांत आली.

## संमेलन

म. सा. संमेलनाचें २७ वें अधिवेशन सांगली येथे महाराष्ट्र रंगभूमि शताब्दमहोत्सव व महाराष्ट्र नाट्य संमेलनाबरोबर ता. ५ ते ८ नोव्हेंबर १९४३ या कालावधींत भरणार आहे. संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी नियामक मंडळाने निवडलेलीं प्रा. मा. दा. आळतेकर, प्रा. कृ. पां. कुळकर्णी, प्रा. श्री. म. माटे, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर व श्री. मा. वि. वरेरकर हीं पहिलीं पांच नांवें (वर्णानुक्रमें) सांगली स्वागतसभेस कळविलीं व स्वागतमंडळाने अध्यक्ष म्हणून प्रा. श्री. म. माटे यांची निवड केली. संमेलनाध्यक्ष प्रा. माटे यांचा सत्कार परिषदेतर्फे प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली ता. १८ ऑक्टोबर दिवशीं करण्यांत आला. हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष पं. माखनलाल चतुर्वेदी ह्यांचाहि मुक्काम पुण्यांत असल्याने त्यांसहि परिषदेने निमंत्रण करून याच वेळीं त्यांचाहि सत्कार केला.

पुढील अधिवेशनाचें निमंत्रण परिषदेकडे धुळें येथील वाङ्मयसेवामंडळाकडून आलें असून स्वीकारासाठी तें सांगली संमेलनाकडे रीतसर पाठविण्यांत आलें आहे.

**परीक्षा**

अुमेदवारांकडील अर्ज स्वीकारण्याची शेवटची तारीख १५ नोवेंबर १९४३ ही आहे. अुमेदवारांनी शुल्कासह अर्ज करावेत. तूर्त पुढील केंद्रें निश्चित झालीं आहेत. पुणें, मुंबअी, नागपूर, अिंदूर, सोलापूर, पंढरपूर, जळगांव, नांदेड, औरंगाबाद, मोमीनाबाद, हैदराबाद (दक्षिण), अहमदनगर, तासगांव (सातारा), सातारा, सांगली, बेळगांव. परीक्षेचें ठिकाण अुमेदवारांचे अर्ज आल्यानंतर कळविण्यांत येअील.

अुमेदवारांच्या सोयीसाठी प्राज्ञ व विशारद या परीक्षांसाठी योजिलेले वर्ग यथापूर्व चालू असून मागील अंकीं प्रसिद्ध केल्याप्रमाणे सर्व अध्यापकांचें सहकार्य परिषदेस मिळत आहे.

**स्वाध्यायमंडळ**

या मंडळातर्फे श्री. वाळिंबे यांचीं 'टीकाशास्त्र व वाङ्मयीन मूल्यें' या विषयावरील अुरलेलीं दोन व्याख्यानें ता. १८ व १९ सप्टेंबर दिवशीं झालीं.

हल्ली पुण्याला वास्तव्य करीत असलेले सुप्रसिद्ध कानडी पंडित व कवि प्रा. दत्तोपंत बेंद्रे यांस ता. २९ ऑगष्ट दिवशीं मुद्दाम पाचारण करण्यांत आलें. अर्वाचीन कानडी काव्याबद्दल माहिती अभ्यासकांस व्हावी हा या निमंत्रणांतील हेतु होता. प्रा. बेंद्रे यांनी थोडी माहिती सांगितली व पुढे सुमारे १-१॥ तास कानडी काव्यगायनाचा अुत्कृष्ट कार्यक्रम झाला. श्री. के. नारायण काळे यांचीं 'कलानिर्मितीची प्रक्रिया' या विषयावर दोन व्याख्यानें झालीं. कविसम्राट् रवीन्द्रनाथ टागोर व कै. शि. म. परांजपे यांचे स्मृतिदिनहि साजरे करण्यांत आले. कविसम्राट् टागोर यांचा स्मृतिदिन रा. ब. प्रि. म. का. कारखानीस यांच्या अध्यक्षतेखाली झाला. या वेळीं श्री. श्री. के. क्षीरसागर, श्री. गो. ग. तळवलकर व श्री. के. नारायण काळे यांचीं भाषणें झालीं. कै. परांजपे यांच्या स्मृतिदिनानिमित्त 'त्रिकाळ'चे संपादक श्री. शि. ल. करंदीकर यांचें अत्यंत मननीय असें भाषण सुमारें दीड तास झालें.

**व्याख्यानसत्र**

या वर्षी म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळानें विविध विषयांवर त्या त्या विषयांतील तज्ज्ञांचीं व्याख्यानें करविण्याची योजना केली व त्याप्रमाणे या योजनेचा आरंभ म्हणून प्राचार्य ध. रा. गाडगीळ यांचीं ता. २८, २९, ३० ऑगस्ट या दिवशीं व्याख्यानें करविण्यांत आलीं. व्याख्यानांचे विषय 'युद्धमान राष्ट्रांचा फडणविशी व्यवहार', 'चलनवृद्धि व तिचे परिणाम' व 'युद्धकालीन आर्थिक धोरण' हे होते. व्याख्यानांसाठी नाममात्र मूल्य घेअून प्रवेशपत्रिका देण्यांत आल्या व प्रत्येक व्याख्यानास सुमारें १२५-१५० अभ्यासक अुपस्थित होत असत.

**परिभाषाचर्चामंडळ**

लाहोर येथील सुप्रसिद्ध विद्वान् डॉ. रघुवीर यांनी अेक 'आंग्ल भारतीय महाकोश' तयार करण्याचें काम हातीं घेतलें असून ह्या योजनेची माहिती व्हावी व परिषदेच्या परिभाषामंडळाच्या या विषयांतील झालेल्या कार्याचा डॉ. रघुवीर यांस परिचय व्हावा या हेतूने डॉ. रघुवीर यांस म. सा. परिषदेच्या मंदिरांत ता. ३-९-४३ दिवशीं पाचारण करण्यांत आलें होतें. सुमारें तासभर डॉ. रघुवीर यांनी आपल्या योजनेचा परिचय सभासदांस करून दिला. शास्त्रीय शिक्षणाच्या जोमदार वाढीसाठी व सौकर्यासाठी निरनिराळ्या प्रांतिक भाषांचा माध्यम म्हणून अुपयोग करावयास पाहिजे, परंतु हें साध्य होण्यासाठी हिंदुस्थानांत पुष्कळशा प्रांतिक

भाषांना मान्य होणारी व त्यांना सुलभ रीतीने आत्मसात् करतां येण्याजोगी अशी अेक सर्व-सामान्य परिभाषा तयार झाली पाहिजे हें अुघड आहे, व त्यासाठी या महाकोशाचा खास अुपयोग होअील असें त्यांनी सांगितलें. या कोशांतील प्रतिशब्द संस्कृतवरून सिद्ध केले जातील. या कोशाचें काम सुमारें दहा वर्षेपर्यंत चालणार असून वार्षिक वर्गणी रु. ३० ठेविली आहे. संपादकमंडळांत भारतांतील निरनिराळ्या भाषांतील सुप्रसिद्ध विद्वान् आहेत. परिषदेच्या परिभाषामंडळाचें मतहि डॉ. रघुवीर यांच्याप्रमाणेच असल्याने त्यांच्या कार्यांत शक्य तें सहकार्य करण्याचें आश्वासन देण्यांत आलें.

**पुरवणी—** गेल्या अंकीं वाङ्मयसंमेलनविषयक वृत्त लिहितांना अेका गोष्टीचा अुल्लेख करण्याचें चुकून राहून गेलें. पुणें येथील श्री. श. दा. चितळे यांनी या परिषदेंत भाग घेअून कांही विधायक सूचना केल्या व संमेलन यशस्वी होण्यास मदत केली.

## नवीन सभासद

**हितचिंतक**

श्री. गायकवाड, पाटील, अण्णासाहेब जयवंतराव मुंढवें (पुणें)

**तहहयात सभासद**

श्री. फडतरे, देशमुख, सखाराम ज्ञानोजीराव, पुणें
डॉ. मुळे, भालचंद्र वामन, सोलापूर
श्री. केळकर, कृष्णाजी हरि ,,

**तहहयात (साधारणांतून)**

श्री. अत्तरदे, तोताराम पूना, पुणें
,, जामदार, शंकर नीलकंठ, सोलापूर
,, लळित, रंगनाथ विष्णु ,,
,, पटवर्धन, गोविंद परशुराम ,,
कु. अळंदकर, शशिकला ,,
श्री. जक्कल, बाबूराव नरसप्पा ,,
,, पटवर्धन, शंकर गोविंद ,,
,, साठे, विश्वनाथ भिकाजी ,,

**साधारण सभासद**

श्री. बाम, प्रभाकर गंगाधर पुणें
,, दामले, पी. आर्. ,,
,, शाह, अंबालाल शिवचंद ,,
,, भिडे, बलवंत चिंतामण ,,
,, देशपांडे, नारायण रघुनाथ ,,
,, गोखले, दत्तात्रेय जनार्दन ,,
,, चंद्रचूड, आबाजी गोविंद ,,
श्री. नेनें, गोपाळ परशुराम पुणें
,, पत्की, गजानन नारायण ,,
,, निमकर, वि. रा. ,,
,, सहस्रबुद्धे, पुरुषोत्तम गणेश ,,
,, मंगरुळकर, अरविंद गंगाधर ,,
,, कुलकर्णी, श्रीधर दिनकर ,,
,, देशपांडे, अंबादास कृष्णराव ,,
,, सरदेशमुख, त्र्यं. वि., सोलापूर
,, कुलकर्णी, के. अेल्. ,,
,, मोसले, डी. टी. ,,
,, कुलकर्णी, व्यं. रा. ,,
,, मंडार, कवठेकर क. ज. ,,
,, पारखे, ग. वा. ,,
,, जंगम, सि. शि. ,,
जोशी, रंगूबाअी ,,
श्री. कुलकर्णी, विश्वंभर दिनकर, आरण
डॉ. शिरोडकर, मुंबअी
श्री. रेगे, पु. शि. ,,
,, कुलकर्णी, कृष्णराव वामन, मुंबअी
,, मांजरेकर, दत्ताराम लक्ष्मण, बेळगांव
,, ठक्कर, हंसराज लक्ष्मीदास, मुंबअी
,, देवधर, सौ. शकुन्तला, आग्रा
,, चतुर्वेदी, माखनलाल, खांडवा
,, अुपाध्ये, अे. टी., बेळगांव

## संलग्नसंस्थावृत्त

महाराष्ट्र समाज, महू, या संस्थेचा अेकोणिसावा वृत्तान्त परिषदेकडे आला आहे. संस्थेने या वर्षी अेकूण बेचाळीस लहानमोठे कार्यक्रम केले. संस्थेतर्फे वाचनालय व व्यायाम-शाळा चालविण्यांत येते. संस्थेच्या अिमारतींत प्राथमिक शाळेस जागा देण्यांत आली असून तिची प्रगति होत आहे.

---

## संपादकीय

पत्रिकेचा या वर्षाचा हा शेवटचा अंक. गेलीं दोन तीन वर्षे ठरलेल्या व परिषदेच्या समासदांस मान्य झालेल्या धोरणानुसारच या वर्षींहि पत्रिका चालविण्यांत आली. यंदा कागदा-संबंधीच्या परिस्थितीने आणि परिषदेवर पडलेल्या नेहमीपेक्षा अधिक आर्थिक बोजामुळे पत्रिकेला आपला विस्तार बराच कमी करावा लागला, आणि यामुळे अेकंदर वाङ्मयहि वाचकांस कमी पुरवितां आलें याची जाणीव चालकांस आहे. पुढील वर्षी या दोन्हींबाबत परिस्थिति सुधारेल अशी आशा आहे. पत्रिकेला परिषदेचें मुखपत्र म्हणूनहि कांही कर्तव्य असल्याने तिचा कांही भाग वृत्तान्त, वार्ता, टिपणें यांच्या स्वरूपाचा अपरिहार्यपणें असतो. पण वाङ्मय-दृष्ट्या यांचीहि अुपयुक्तता आहेच. या वर्षी जीं कांही नवीन, लहान लहान सदरें छापण्यांत आलीं त्यांमागे हीच दृष्टि आहे. तथापि पत्रिका म्हणजे बृहन्महाराष्ट्रांतील साहित्यविषयक चळवळीचा सविस्तर अहवाल नव्हे हेंहि लक्षांत ध्यावें लागतें. पत्रिकेंत संपादकीय म्हणून साहित्य-विषयक लेखन अधिक यावें अशी कांहींची अपेक्षा आहे. तसें करण्याची अिच्छा असूनहि स्थलाभावीं अितरांच्यापेक्षा संपादकाच्या लेखनासच अर्धचंद्र दिल्यास स्वार्थीपणाचा आरोप तरी येणार नाही असें वाटल्याने संपादकीय या वर्षींहि अत्यल्पच आणि परिषदेच्या व्यवहार-विषयक अंगासंबंधीच आलें.

* * *

पत्रिकेची खरी वाङ्मयीन अुपयुक्तता सध्या तरी कांही महत्त्वाचे पण जड असे विद्वत्ताप्रधान लेख (त्यांना अितरत्र स्थान मिळणें कठीण जातें) आणि विशेषतः विविध ग्रंथांवरील परीक्षणें आणि वार्षिक समालोचनें यांमध्ये आहे. मनोरंजन, काव्य आणि कथा यांसारख्या स-रस लेखनाने होणारें मनोरंजन पत्रिकेला आज तरी स्थलाभावीं करतां येत नाही. जागेची अडचण असूनहि चांगल्या ग्रंथांवर त्यांतल्या त्यांत विस्तृत परीक्षण येण्याजोगें असेल तर तें म. सा. पत्रिकेंत येअील अशी ग्रंथलेखकांची आज तरी भावना दिसते. असें असूनहि मराठीमध्ये प्रसिद्ध होणारीं अनेक पुस्तकें परिषदेकडे किंवा पत्रिकेकडे येत नाहींत. मराठी भाषा आणि वाङ्मय यांसंबंधी काम करणारी मध्यवर्ती संस्था जी परिषद् तिच्यासंबंधी आमच्या लेखकांची आस्था अशा प्रकारची आहे. ज्यांना आज प्रथितयश साहित्यिक मानण्यांत येतें त्यांची अनास्था साधारणपणें सर्वांत

अधिक असें दिसून येतें. वार्षिक समालोचनें संपूर्ण व निर्दोष व्हावयाचीं असतील तर परिषदेकडे सर्व पुस्तकें यावयास हवींत. नाही तर समालोचकांना सर्व साहित्य पुरवितां येत नाही. काय प्रसिद्ध झालें आहे तें सारें कळणें दुरापास्त होतें; समालोचकांच्या स्वतःच्या परिश्रमांवर व आस्थेवर अवलंबून राहावें लागतें. अशा परिस्थितींतहि ज्या समालोचकांनी या वर्षींहि आपलें कार्य केलें त्यांची पत्रिका अत्यंत ऋणी आहे. तसेंच, दर तिमाहीला निरलसपणें आपआपल्या विभागामधील पुस्तकांचीं परीक्षणें ज्या लेखकांनी लिहिलीं, साहित्यवार्ता पाठविली आणि निरनिराळ्या भाषांतील वाङ्मयीन हालचालीविषयी पत्रद्वारें माहिती पुरविली त्या सर्वांची पत्रिका आभारी आहे. असेंच साहाय्य यापुढेहि त्यांनी करावें अशी विनंती आहे.

* * *

परिषदेचे या वर्षीचे ग्रह चांगले नसावेत अशी भीति गेल्या अंकांत आम्हीं प्रदर्शित केली होती. तिचा प्रत्यय शेवटपर्यंत येत राहिला. वर्षारंभीं तिचे अेक विश्वस्त रा. ब. पाध्ये, वर्षमध्याला तिचे अध्यक्ष प्रा. जोशी आणि आता तिचे अेक प्रमुख आश्रयदाते अिचलकरंजीचे अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे हे दिवंगत झाले. श्री. बाबासाहेबांची विद्याविषयक व वाङ्मयविषयक आस्था सुप्रसिद्धच होती. परिषदेशींहि त्यांचा निकट संबंध आलेला होता. १९२७ सालच्या पुणें येथील संमेलनाचें अुद्घाटन त्यांच्या हस्तें झालें होतें. परिषदेच्या मंदिराचें अुद्घाटनहि ३७ सालीं त्यांच्याच हस्तें झालें. १९३३ सालीं परिषदेच्या कचेरीस व्यवस्थित स्वरूप अद्यापि आलें नव्हतें अशा वेळीं अेक वर्षभर दरमहा वीस रुपयेप्रमाणे कचेरीच्या खर्चाप्रीत्यर्थ देअून तिला आपल्या पायावर अुभें राहण्यास त्यांनी साहाय्य केलें तें खरोखर बहुमोलाचें होतें. शिवाय अलीकडे म्हणजे ४१ सालीं परिषदेच्या नांवाने तिच्या वार्षिक खर्चासाठीं २००० रु. चे कर्जरोखेहि श्रीमंतांनी करून दिले आहेत. परिषदेकरिता कांही नैमित्तिक कार्यास मोठी मदत देणें हें जितकें महत्त्वाचें तितकेंच महत्त्वाचें आणि आवश्यक तिच्या दैनंदिन कार्याची चिंता वाहणें हें आहे. श्री. बाबासाहेबांच्या निधनाने परिषदेचा अेक मोठा हितचिंतक नाहीसा झाला आहे. अीश्वर त्यांच्या आत्म्यास सद्गति देवो !

# साभार स्वीकार

**मंगळागौर**— ले० ना. धों. ताम्हनकर; प्रका० दा. ना. मोघे, स्कूल ॲन्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य १२ आ.

**काँग्रेस आणि महायुद्ध**— ले० पां. वा. गाडगीळ, प्रका० वा. रा. मेस्त, ७९ हिंदु कॉलनी, दादर; मूल्य २ रु.

**Marathi Language Course**— ले० एच्. एम्. लॅम्बर्ट; प्रका० ऑक्सफर्ड युनिव्ह. प्रेस, मुंबई; मूल्य १० रु.

**चंदनवाडी**— ले० ग. त्र्यं. माडखोलकर; प्रका० देशमुख आणि कं., ९९१ शनिवार, पुणें २; मूल्य ६॥ रु.

**शेक्सपियरच्या नाट्यकथा**— ले० रा. ना. झोळ; प्रका० वत्सला साहित्य प्रकाशन, पुणें २; मूल्य २ रु.

**ठिणग्या आणि टिकल्या**— ले० मा. कृ. शिंदे; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबअी ४; मूल्य १॥ रु.

**मंगललहरी**— ले० बालसुत; प्रका० शेठ शांतिदास लुहाडे, धर्माबाद (निझाम) मूल्य ८ आ.

**विसर्जन**— ले० वि. म. कुळकर्णी; प्रका० म. म. केळकर, मनोहर ग्रंथमाला, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १२ आ.

**ना. डॉ. खरे चरित्र**— ले० ज. रा. जोशी; प्रका० सौ. सुशीलाबाई जोशी, बुटीवाडा, सीताबर्डी, नागपूर; मूल्य ३॥ रु.

**त्रिलिंग देशांतील दैनंदिनी**— ले० कृष्णाकुमार; प्रका० ग. ना. अंबेकर, गोदावरी प्रिंटिंग प्रेस, नांदेड (निज़ाम); मूल्य २ रु.

**प्रणय**— ले० गो. के. मट; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, केळेवाडी, मुंबअी ४; मूल्य ३॥ रु.

**प्रमद्वरा**— ले० ग. त्र्यं. माडखोलकर; प्रका० दि. मा. घुमाळ, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य २॥ रु.

**बंगला आणि झोपडी**— ले० व प्रका० प्र. रा. सरनोबत, ४७६ शनिवार, पुणें २; मूल्य १॥ रु.

**कपिलाषष्ठी**— ले० व प्रका० प्र. रा. सरनोबत; मूल्य १॥ रु.

**टोळधाड**— ले० वि. ग. भिडे; प्रका० त्रिं. मा. सातारकर, ९६ गंज पेठ पुणें २; मूल्य २ रु.

**शिक्षकांशीं हितगुज**— ले० शं. ब. सुखटणकर; प्रका० सौ. लीलावती सुखटणकर; मूल्य १३ आ.

## साभार स्वीकार

श्री. यशवंत गोपाळ जोशी, सदाशिव पेठ, पुणें २ यांचीं प्रकाशनें:—

१ मार्क्सचें कॅपिटल्-सारग्रंथ—ले० पां. वा. गाडगीळ, मू. १० रु.
२ जडवाद अर्थात् अनीश्वरवाद—ले० तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, मू. १। रु.
३ हिंदुत्ववाद—ले० ज. स. करंदीकर, मू. २॥ रु.
४ राष्ट्रवाद—ले० श्री. य. कोल्हटकर, मू. २ रु.
५ मार्क्सचा भौतिकवाद—ले० पां. वा. गाडगीळ, मू. १ रु.
६ अराज्यवाद—ले० पां. वा. गाडगीळ, मू. १ रु.
७ फॅसिझम्—ले० पां. वा. गाडगीळ, मू. १ रु.
८ सोशॅलिझम अर्थात् सुलभ समाजवाद—ले० पां. वा. गाडगीळ, मू. १ रु.
९ ईश्वरवाद—ले० शं. वा. दांडेकर, मू. १॥ रु.
१० विश्वकुटुंबवाद अर्थात् कम्यूनिझम—ले. ना. ग. गोरे, मू. १॥ रु.
११ साम्राज्यशाही—ले० ना. ग. गोरे, मू. १ रु.
१२ गांधीवाद—ले० शं. द. जावडेकर, मू. १॥ रु.

———

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास

(म. सा. परिषदेचें ग्रंथप्रकाशन)

वरील ग्रंथ प्रा. दत्तो वामन पोतदार यांजकडून मुद्दाम लिहवून घेतला आहे. या ग्रंथांत म. सा. परिषदेची इ. स. १९०६ ते १९४२ अखेरची व म. सा. संमेलनांची इ. स. १८७८ ते १९४२ अखेरची संपूर्ण व साधार माहिती आली आहे. मराठी भाषेच्या उन्नतिप्रीत्यर्थ स्थापन झालेल्या या आद्य व प्रातिनिधिक संस्थांची अद्यावत् माहिती या ग्रंथांत मोठ्या परिश्रमाने संकलित करण्यांत आली असून वृत्तविभागांतील प्रकरणांतून या सर्व माहितीच्या आधारें प्रा. पोतदार यांच्या मार्मिक विहंगमावलोकनाचा लाभहि वाचकांस होणार आहे. संमेलन-परिषद् या संस्थांच्या हितचिंतकांस व इतर अभ्यासकांसहि हा ग्रंथ संदर्भग्रंथ म्हणून उपयोगी पडेल अशा तऱ्हेने या ग्रंथाची मांडणी झालेली आहे. आकार रॉयल अष्टपत्री. पृष्ठें १७५. मूल्य रु. ३. सभासदांस रु. १॥. ट. ख. नि.—

चिटणीस
म. सा. परिषद्, पुणें २

